


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका








# कपडे असावेत तर असे...



## डेटने धुतलेले

● **डेटनें धुतलेले कपडे अधिक उजळ दिसतात.**
डेटचें वैशिष्ट्यच असें आहे कीं त्यानें धुतलेले कपडे अगदी नव्यासारखे होतात.

● **डेटनें धुतलेले कपडे पांढरेशुभ्र निघतात.**
कपडे धुण्यासाठीं डेटसारखी आदर्श पावडर नाहीं. डेटमध्यें कपडे धुतांना नीळ वापरावा लागत नाहीं किंवा इतरहि तत्सम द्रव्य घालावें लागत नाहीं; कारण डेटमध्यें खास 'ऑप्टिकल ब्राइटनर' घातलेलें असतें.

● **डेटनें कपडे धुणें ही एक आधुनिक पद्धती आहे.**
पाणी क्षारयुक्त असो वा नसो डेटचा फेंस कसा भरभरून येतो! सुती, रेशमी, रेयॉन्स, लोकरी—सफेद किंवा रंगीत सर्व प्रकारच्या कपड्यांसाठीं डेट बिनधोकपणें वापरतां येतें—




**डेटनें धुतलेले पांढरेशुभ्र व उजळ कपडे बघून डोळे कसे जातात दिपून**

**स्वस्तिक** ऑईल मिल्स लि., मुंबई-१



अनुक्रमणिका

साहित्य ★ कला ★ संस्कृति



वर्ष १८ वें
एप्रिल
१९६२

# दीपावली

श्रेयनामावलि—



* संपादक-मुद्रक-प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल.** दलाल आर्ट स्टुडिओ ४०-४२ केनेडी ब्रिज, मुंबई ४ * प्रत्येक प्रतीस किंमत रु. . अधिक रजिस्टर पोष्ट ५० नये पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. २॥. * या अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांची अधिकृत मतें असतातच असें नाहीं. * या मासिकांतील प्रकाशित चित्रें व लेख यांवरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन.

दलाल आर्ट स्टुडिओ : ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

टेलिफोन
७७७६५






भारतीय कवि-कुल-भूषण : ३



शूद्रक :

## कविता कामिनींचा परिहास

**स्त्रियोहि नाम खल्वेता निसर्गादेव पंडिताः**
**पुरुषाणां तु पांडित्यं शास्त्रैरेवोपदिश्यते ॥**

ललित साहित्यांतील सौंदर्य हें बहुशः पुरुषाला स्त्रीविषयीं वाटणाऱ्या प्रणय भावनेच्या छटांवर अधिष्ठित असतें. या छटा सुरम्य तर खऱ्याच. पण हाच प्रणय कामिनीला कांताबद्दल वाटणारा असेल तर त्याच्या छटांची माधुरी काय वर्णावी ! जलधारांनीं अंगें भिजलीं आहेत अशाहि अवस्थेंत, आपला कांत चारुदत्त याच्याशीं अभिसारिका म्हणून जाऊन त्याला आपल्या आलिंगनानें धन्य करणाऱ्या वसंतसेनेची मृच्छकटिक ही कथा त्यामुळेंच संस्कृत साहित्यांत आपल्या आगळेपणानें चिरंजीव झालेली आहे.

अभिसारिकेची कथा एवढाच या नाटकाचा आगळेपणा नाहीं संस्कृत साहित्य हें जगाच्या साहित्यांत मूर्धाभिषिक्त सम्राज्ञीचा मान पावलें आहे ही गोष्ट खरी. परंतु सम्राज्ञीचें जीवन पुष्कळदां शिष्टा चारांच्या परंपरांमुळें बंदिवानासारखें होतें. वर्तनाचे कांटेकोर नियम हे जीवन कारावासाप्रमाणें असह्य करून टाकतात. संस्कृत साहित्याचे असेंच झालें आहे. नाटकाला इतकेच अंक अथवा काव्याला इतकेच सर्ग हवेत; त्यांचे नायक नायिका विशिष्ट परिस्थितीतीलच हवेत; त्यां अमूक विषयांचीं वर्णनें हवींत; अमुकांची असतां कामा नये, असल्य कांटेकोर नियमांची चौकट परंपरेनें संस्कृत साहित्याभोवतीं घातलेल आहे. प्रतिभेची भरारी थिटी पडली कीं हे नियम म्हणजेच साहित्य असें घडून आशयाचें महत्त्व नाहींसें होतें. या जाचक नियमांची बंधनं कविता सम्राज्ञी पाळते खरी. पण एकादे वेळीं तिलाहि यांच्या कचाट्यां तून सुटून, मनसोक्त क्रीडा करावी, परिहास करावा, खळखळून हंसावें क्षणभर अनिर्बंध व्हावें असें वाटत नसेल काय ? अवश्य वाटत असावें

तिचा अशा अनिर्बंध परिहास, मनमोकळी क्रीडा, मृच्छकटिक नाटकांत दिसून येते हा त्याचा दुसरा आगळेपणा आहे.

मृच्छकटिकाचा नायक देव अथवा राजा नाहीं तर एक व्यापारी आहे. त्याची नायिका राणी नसून गणिका आहे. या चाकोरी बाहेरच्या युगुलाच्या प्रणय जीवनाशीं, रस्त्यांतील मारामाऱ्या, जुगाऱ्यांचे अड्डे, घरफोड्या, न्यायालयांतील खटले, राज्यक्रांती, असे परंपरेबाहेरचे प्रसंग आणि त्यांत भाग घेणाऱ्या उच्चनीच थरांतील परंपरेबाहेरच्या व्यक्ति, यांचा बेमालूम सांधा जुळवून शूद्रकानें ही आगळी कथावस्तू निर्माण केलेली आहे. त्यामुळें संस्कृतांतील इतर प्रणयकथांपेक्षा ही अधिक जिवंत आणि रसरशीत वाटते. एवढेंच नाहीं तर संस्कृत साहित्याला संपूर्णपणें अपरिचित असा, आजच्या विदग्ध टीकाकारानाहि डोलावयास लावणारा अभिजात विनोद, परंपरेचे ठोकळे झुगारून, या नाटकाच्या जडणीत जोडला गेला आहे. म्हणून या नाटकांत संस्कृत कवितेचें दरबारी दर्शन होण्याऐवजीं, अंतर्गृहात मनमोकळी परिहासक्रीडा करताना दर्शन होतें आणि वेगळाच प्रत्यय येतो.

असा प्रत्यय आणून देणाऱ्या या नाटकाचा कर्ता शूद्रक याची आपणास कांहींच निश्चित माहिती नाहीं. तो शूद्र असावा, जातिवंत कलाकार असला तरी विदग्ध पंडित नसावा, आंध्रभृत्य राजघराण्याचा मूळपुरुष शिमुक हाच तो असवा आणि त्याचा काल खिस्तपूर्व एक शतक असावा असें मत पंडितलोक बनवीत होते. तेवढ्यांत भासाच्या नाटकांचा शोध लागून आधींच घोटाळत असलेला हा प्रश्न साफ हाताबाहेर गेला. कारण भासाच्या नाटकांतील चारुदत्त हें नाटक जवळजवळ शब्दशः मृच्छकटिकाच्या पहिल्या चार अंकात गोवलें गेलें असून त्यावरच पुढील सहा अंकांची उभारणी केलेली आहे.

पंडितांचा घोटाळा झाला तरी रसिकांच्या आनंदांत उणेपणा यावयास नको. चोरानें घर फोडून सर्वस्व नेल्यावरहि, घर फोडण्याच्या चोराच्या कुशलतेचें कौतुक करणारा, अव्यवहारी पण गुणी आणि गुणज्ञ चारुदत्त, आणि त्याच्या गुणावर मोहून सर्वस्वाचें दान करणारी गणिका वसंतसेना यांच्या या धीट प्रणयाच्या दर्शनानें मन प्रसन्न आनंदानें मोहून जातें. वसंतसेना गणिका असली तरी ती कुलवधूंना आदर्श मानावी अशी गुणवती असते. सत्ताधारी राजपुरुषाची प्रीति धुडकावून लावून दरिद्री प्रियकरास जवळ करताना ती म्हणते 'प्रीती गुण पहाते सत्ता नव्हे. रत्नाचा रत्नाशींच संयोग शोभतो. मला पुरुष हवा तो सेवा करण्यासाठीं नव्हे तर प्रीतीचा उपभोग घेण्यासाठीं, जीवन जगण्यासाठीं हवा. गुण आणि वैभव एकत्र नसावयाचेंच. जलाशय दूषित असेल तरच तो नेहमी परिपूर्ण रहाणार. उलट मोहर झडून गेला तरी सहकार तरूची छाया सुलदच व्हावयाची.' तिच्या जिवंत प्रणयाच्या यथार्थ रूपाची तिला अशी जाणीव आहे. आणि तो बोलून दाखविण्याची धिटाई आहे.

आपल्या अर्थहीनतेच्या जाणिवेनें कातर झालेल्या चारुदत्ताला ती सांगते "न्यास हा मनुष्याच्या विश्वासावर ठेवतात. संपत्तीच्या अथवा घराच्या विश्वासावर नव्हे." गुणज्ञ आणि रसिक चारुदत्ताला वसंतसेनेची किंमत कळून चुकते. पण चारुदत्ताच्या हितास जपणारा त्याचा एकनिष्ठ सखा मैत्रेय याला ही गणिका चारुदत्तास लुटील अशी भीती वाटत असते. भरराज्रीं अभिसारिका म्हणून वसंतसेना चारुदत्ताच्या मिठींत शिरते तेव्हां तो भोळा ब्राह्मण गोंधळून जातो आणि विचारतो, "आज ही इथेंच झोंपणार आहे काय?" या त्याच्या प्रश्नानें चारुदत्त आणि वसंतसेना यानाःहि हंसू आल्याशिवाय रहात नाहीं. या नाटकांतील सारा उच्च विनोद स्वभावांवर आधारलेला आहे. जगांतील पहिला श्रेष्ठ विनोद हाच होय.

या धीट आणि बेदरकार अभिसाराच्या शृंगारकथेंत चारुदत्ताची पत्नी नामशेष होत नाहीं हें औचित्य तर फारच हृद्य वाटतें—वसंतसेनेचें प्रेम हें शकुंतलेच्या प्रेमापेक्षांहि कांकणभर अधिक जोमदार आणि आत्मार्पण करणारें असलें तरी दुष्यंताच्या पूर्वपत्नीप्रमाणें, त्या प्रेमांत चारुदत्ताच्या पत्नीची धुळधाण न होतां, वसंतसेना समुचित आदरानें तिचें मन जिंकून शेवटीं तिची पाठची बहीण बनून जाते. संस्कृतांतील इतर शृंगार कथांतील प्रणय हा पुष्कळदां प्रणयासाठींच केला असवा असें वाटतें. त्या उलट मृच्छकटिकांतील जीवनदर्शनाच्या व्याप्तीमुळें ती नुसती प्रणयकथाच न रहातां जीवनकथा बनून जाते.

मला पुरुष सहवास हा जीवनाचा आनंद लुटण्यासाठीं हवा असें म्हणणारी वसंतसेना ही जणूं काय नवआनंदाचें सृजन हें आत्मार्पणातून होतें, दिव्य भोग हे दिव्य त्यागातून फलित होतात, हें जगूनच दाखवीत आहे. चारुदत्ताचा पुत्र रोहसेन हा आपली धात्री रदनिका हिच्याकडे सोन्याच्या खेळण्यासाठीं हट्ट करीत असतां वसंतसेना तेथें येते. तेव्हांचा प्रसंग पहा.

रोहसेन : रदनिके, ही कोण ग?

वसंतसेना : बाळा मी तुझ्या पित्याची दासी आहे.

रदनिका : रोहसेना, ही तुझी आई आहे बरं.

रोहसेन : हॅट्. खोटें. ही आई असेल तर अलंकार कसे घालील?

वसंतसेना : ( नेत्र करुणेनें पाणावतात. आपले अलंकार काढून त्याच्या खेळण्यांत टाकते ) बघ. आतां झालें मी तुझी आई.

रोहसेन : छे. तूं तर अलंकार काढतांना रडत आहेस.

वसंतसेना : ( नेत्र पुसून ) हें बघ. आतां?

अशा वृत्तीनें अभिसार करणारी ही गणिका शेवटीं राजाकडून कुलवधू म्हणून घोषित केली जाते. विसाव्या शतकांतील पुरोगामी लेखकाचीहि झेंप जिथपर्यंत जात नाहीं तिथपर्यंत शूद्रकानें ही झेंप घेतली आहे. गणिकेची कुलवधू बनवून तिला शिरावर घेणाऱ्या शूद्रकाच्या या दृष्टींत किती व्यापक द्रष्टेपणा ओथंबला आहे, याकडे गेल्या दोन हजार वर्षांत कोणीहि आवर्जून लक्ष दिलेलें नाहीं. 'कुल हें दैवाधीन असतें' असें कर्णानें सांगून हजारों वर्षें गेलीं तरी आपणास तें उमगलेलें नाहीं; तिथें आपण बिचाऱ्या शूद्रकास थोडेच दाद देणार? आम्ही परंपरेचे गुलाम आहोंत. आपली कविता कामिनीहि परंपरेंतच गुंतलेली आहे. म्हणून तर म्हणावयाचें कीं मृच्छकटिक नाटक ही तिनें दरबारी नियमाना झुगारून अनिर्बंधतेच्या क्षणिक उत्स्फूर्तीमध्ये केलेली रम्य क्रीडा आहे, परिहास आहे.

—आनंद साधले



अनुक्रमणिका






## मला आवडलेलीं कांहीं पुस्तकें

*गेल्या महिन्यापासून सुरुं झालेल्या नव्या लेखमालेंतला*
**श्री. शामराव निलकंठ ओक**
*यांचा हा दुसरा लेख—*




दोन वर्षांपूर्वी हें * पुस्तक वाचायला मिळालें होतें, त्या वेळीं मीं त्याची तारीफ केल्यावरून एका प्राध्यापक मित्रानें तें वाचलें व आपल्याला तें विशेष आवडलें नसल्याचें त्यानें प्रांजळपणाणें सांगितलें. यावेळीं त्या पुस्तकाबद्दल लिहिण्याच्या निमित्तानें तें पुन्हां वाचल्यानंतर मलाच हें पुस्तक कां आवडलें याचा विचार करतां लक्षांत आलें की डॉर्नफोर्ड येटस् या लेखकाचीं सर्व पुस्तकें मीं अगोदर वाचलीं असल्यामुळें तो माझ्या पसंतीचा लेखक आहे, व हें पुस्तक त्या सर्व पुस्तकांच्या शेवटीं आठवणीवजा आत्मनिवेदन असल्यामुळें, तीस पुस्तकांच्या गोडीचा एकदम पुनःप्रत्यय त्यांत मिळाल्यामुळें, त्याचप्रमाणें त्यांतल्या विविध हकीकती रसभरित वाटल्यामुळें मला पुस्तक आवडलें. ( गेल्या अंकात नोंदलेलें वुडहौसबद्दलचें अस्बॉर्नचें पुस्तकही एका परिनें ऐशीं पुस्तकांचें साक्षेपी रसग्रहण या घाऊक सौद्यासाठीं मला आवडलें असावें असें आतां लक्षांत येतें. )

दोन महायुद्धांच्या दरम्यानच्या सुमारें वीस वर्षांत करमणुकीस वाहिलेलीं अशीं तीन नामांकित इंग्रजी मासिकें होऊन गेलीं. उत्तम कागद व छपाई, पहिल्या दर्जाच्या चित्रकारानीं काढलेली भरपूर प्रसंग चित्रें आणि एकाहून एक तरबेज अशा लेखकांच्या विविध गोष्टीं यांनी त्या काळांत 'स्ट्रॅण्ड' 'पियर्सन्स' व 'विंडसर' हीं मासिकें नटलेलीं असत. त्यापैकीं सर्वांत जुन्या स्ट्रॅण्डमध्यें कॉनन डॉइल पासून वुडहौसपर्यंत अनेक थोर कथालेखकांनीं हजेरी लावली होती. पियर्सन्स मध्यें 'सॅपर' च्या साहसकथा, डॉ. थॉर्नडाईक या 'शास्त्रीय तंत्रवादी' डिटेक्टिव्हच्या गोष्टी, ( नंतर प्रकाशक बनलेल्या ) हर्बर्टजेन्किन्सच्या बिंडल या कामगारवर्गांतील जोडप्यांबद्दलच्या विनोदी गोष्टी, असा मसाला असे. विंडसर मासिक हुजूरपक्षीय वळणाचें होतें, पण त्यांतल्या हास्यकथा फार आकर्षक असत. श्रीमंत कुटुंबांतील मंडळींच्या वेगवेगळ्या प्रसंगांतील त्या गंमती खेळकरपणें सांगणारा लेखक डॉर्नफोर्ड येटस् एका मर्यादित समाजांत बराच लोकप्रिय होता. त्याच्या त्या गोष्टींचे संग्रह पुस्तकरूपानें प्रसिद्ध होऊन त्यांच्या पुनरावृत्त्या अजूनही निघत आहेत.

परंतु 'हलक्याफुलक्या' गोष्टी लिहिणारा म्हणून त्याच्याबद्दल जरा तुच्छतेनें उल्लेख एका परीक्षणांत आल्यानंतर त्यानें साहसकथा, आणि त्याही शक्य तितक्या उत्कृष्ट भाषेंत लिहून आपलें कसब शाबीत करण्याचा चंग बांधला. लौकरच एकाहून एक चित्तवेधक कादंबऱ्या लिहून त्यानें विसाव्या शतकांतल्या इंग्रजी साहसकथांचे आदर्श वस्तुपाठ वाचकांपुढें ठेवले. समकालीन वातावरणांत मध्ययुगीन समरप्रसंग उभे करण्याची त्याची हातोटी अप्रतिम आहे. त्याच्या साहसकथा असंभाव्य वाटत नाहींत; त्यांच्यामधला कार्यकारण भाव तर्कशुद्ध असतो, तपशील अचूक असतो, दोन तुल्यबल विरोधी पक्षांचें द्वंद्व उत्कंठा सतत टिकविण्याइतकें समतोलपणें चालून शेवटीं सत्पक्षाचा जय होतो. येटस् जास्त लोकप्रिय झाला तो साहसकथांचा लेखक म्हणूनच. 'विनोदी' अशा कथांचे त्याचे आठ संग्रह आहेत, साहस विषयक अठरा व खानदानी समाजाच्या वातावरणांतील चार अशा बावीस कादंबऱ्या, स्वैर कल्पनास्वच्छ

* "ॲज बेरी ॲण्ड आय वेअर सेइंग" लेखक : डॉर्नफोर्ड येटस्—प्रकाशक : वॉर्ड लॉक ॲण्ड कंपनी, लंडन : १९५२ : किं. ८॥ शिलिंग.

म्हणतां येईल अशी ‘ ॲलिस इन वण्डरलॅण्ड ’ सारखी एक परीकथा व प्रस्तुतचें उपसंहारवजा आठवणींचें पुस्तक, इतकी ग्रंथसंपदा येटस्‌नें तीस वर्षांच्या अवधींत वाचकांना दिली. डॉर्नफोर्ड येटस् कोण हें फारच थोड्या लोकांना ठाऊक होतें. ( ‘ तो मींच ’ असें सांगणारे एक दोन भामटे फार वेळ भाव खाऊं शकले नाहींत, त्यांचीं सोंगें लौकरच उघडकीस आलीं. ) वैयक्तिक प्रसिद्धीची आवड मुळींच नसलेल्या या लेखकाचें खरें नांव तो दोन वर्षांपूर्वी दिवंगत झाल्यानंतर वृत्तपत्रांत आलें: मेजर सेसिल विल्यम मर्सर. त्याला दक्षिण ऱ्होडेशियांत उमताली येथें ६ मार्च १९६० रोजीं मृत्यु आला.

‘ बेरी व मीं ’ या आत्मनिवेदनांत येटस्‌नें आपल्या हास्य-कथांमधील आपला मेव्हणा बेरी ह्याला आणून त्याच्याशीं गप्पा मारण्याच्या ओघांत काय काय म्हणायचें होतें तें सांगून टाकलें आहे. उभयतांच्या बायकाहि हजर राहून मधूनमधून प्रश्न ( व निषेध ) करीत राहिल्यामुळें विविध विषयांची मजेदार चर्चा होत राहाते व साधारणतः दर तिसऱ्या पानाला एकहि जुनी हकीकत निघते. बेरी हा नकल्या स्वभावाचा असून बडबड्या आहे. ( पुन्हां मागील अंकाची आठवण करून सांगता येतें कीं वुडहौसच्या स्मिथ–इकेनहॅम या वटवटखोरांचा मूळ नमुना बेरी असावा असा तर्क अस्बॉर्ननें केला आहे ). तीव्र भावना डौलदार भाषाशैलींत व्यक्त करणें हें बेरीचें वैशिष्ट्य, पण त्याचा उत्साह पुष्कळदां आवरावा लागतो. येटस्‌च्या लिहिण्याप्रमाणें, बेरी म्हणाला तें सगळेंच छापल्यास अब्रूनुकसानीच्या अनेक खटल्याचें भय होतें, म्हणून त्याचे ग्राह्य मुद्दे तवढेच पुस्तकांत घेतले. येटस् याचें शिक्षण उत्तम शाळेंत झाल्यानंतर कायद्याचा अभ्यास करून तो बॅरिस्टर झाला. एका अनुभविक ज्येष्ठ बॅरिस्टरचा ‘ ज्यूनियर ’ म्हणून सहा वर्षें काम केल्यावर पाहिलें महायुद्ध आलें त्यात तो तावडतोब दाखल झाला. उत्तमोत्तम बॅरिस्टर त्या लढाईत कामास आले व त्यांच्या गैरहजेरीचा फायदा घेऊन मागे रहणारे धंद्यांत वर आले. वारिष्ठ पिढीचे होते ते न्यायाधीश झाले, राजकारणात पडले किंवा निवृत्त झाले, त्यामुळें न लढलेल्या सधिसाधू वकिलांची पोळी पिकली व तें पाहून बॅरिस्टरीचा नाद सोडून देऊन येटस् धंदेवाईक लेखक बनला. या पुस्तकांत आलले त्याचे अनुभव वकिली पेशातले, सामाजिक जीवनातले आणि लेखन व्यवसायातले असे विविध आहत.

वयाच्या पंधराव्या वर्षी येटस्‌ला कोर्टाचें पहिलें दर्शन घडलें तेंच नाट्यपूर्ण परिस्थितीत. मुलगा पुढें बॅरिस्टर व्हायचा म्हणून ओळखीचा सॉलिसिटर त्याला एक दिवस सहज कोर्टाचें काम दाखवायला घेऊन गेला, आणि ती वेळ नेमकी अशी निघाली की खुनाच्या आरोपावरून एका माणसाला न्यायाधीश फांशीची शिक्षा फर्मावीत होते ! नंतर कनिष्ट वकील म्हणून शागिर्दी करीत असतां त्याची पोलिस खात्याशीं चागली ओळख झाली व मोठमोठे गाजलेले खटले हजर राहून पाहण्याची संधी मिळाली. चोरांच्या वाटा कळल्या, पोलिसांना मिळालेल्या सर्वच माहितीचा पुरावा म्हणून उपयोग कसा होत नाहीं ते समजलें, जडजवाहिरांची चोऱ्या करणाऱ्यांची संघटना कशी असते ती कल्पना आली. हुबेहुब सारख्या दिसणाऱ्या दोन माणसांपैकी एकाला खुनासाठीं फांशी जाण्याची वेळ आली असतां केवळ



डॉर्नफोर्ड येटस्

दैवयोगानें दुसरा मनुष्य सांपडल्यामुळें ती वेळ कशी काय टळली हें त्यानें स्वतः पाहिलें. पुढें लॉर्ड रेडिंग म्हणून हिंदुस्तानचा व्हायसरॉय होणाऱ्या सर रूफस आयझॅक्स याच्या विस्मयकारक बुद्धिमत्तेची व कौशल्याची चुणुक कांहींकांहीं महत्त्वाच्या खटल्यांतून त्याला दिसली. त्याबरोबरच गुन्हेगारवर्गाच्या बदमाश वकीलांचे नमुनेही त्याच्या पुढ्न गेले. विषप्रयोगानें खून झाला असें एका खटल्यांत शाबित होण्यासाठीं निर्णायक पुरावा ऐनवेळीं केवळ योगायोगानें मिळाल्याचा चमत्कार त्याच्या अनुभवास आला. खर्चाच्या नांवाखाली भरमसाट बिल करणाऱ्या लुच्चा सॉलिसिटरला विरुद्ध पक्षाच्या खंबीर सॉलिसिटरनें हात चोळीत बसायला कसें लावलें, कुंटणखाना चालवून खलाशांना लुटून प्रसंगीं मारून टाकणाऱ्या दोन गुंड भावांना एका पोलिसाच्या हुशारीमुळें फांसावर लटकविणें कसें साधलें, फांशीनंतर प्रेतांची ओळख पटविण्यासाठीं गुन्हेगारांची म्हातारी आईच कशी आणावी लागली व तिनें मुलगे आपल्या गुणांनी मेले हें मत शांतपणें कसें व्यक्त केलें, या गोष्टी येटस्‌नें वर्णन केल्या आहेत. बड्या लोकांच्या समाजांत एका मुलीनें मोत्यांचा हार कसा चोरला आणि तिच्यावर आरोप केल्याबद्दल हाराच्या मालकिणीवर मुलीनें बदनामीची फिर्याद केली असतां तो हार गहाण टाकून मिळालेल्या नोटांपैकी एकीचा माग त्या मुलीपर्यंत कसा लागला व तत्क्षणीं मुलगी देश सोडून कशी पळाली ही हकीगत चकित करणारी आहे.

बँकेतल्या एका कारकुनाने मॅनेजरच्या अक्षराची हुबेहूब नक्कल करून बारा शाखांना बारा पत्रें लिहून ‘या गृहस्थाची अमुक रक्कम तुमचेकडे त्याचे नांवावर जमा करावी असें कळविलें. ही पत्रें घेऊन त्याचा साथीदार क्रमाक्रमानें एकेका शाखेकडे गेला व प्रत्येक ठिकाणीं जमा रकमेपेक्षां थोडी कमी रक्कम चेकवर काढून त्यानें एकूण








अनुक्रमणिका



## ओंजळ

पापणीने डंखुनिया
डहुळलेस रंग...अंग
पिचलेल्या पर्शीतून
कलवलला स्वर-अनंग
डोळ्यांतच बुडलेल्या
ओताव्या किती झुळुका
सांकळल्या रक्ताचा
विस्कटला तृणटांका
स्वर-अनंग हसमसला—
रुतव असा जहरी गळ
नियतीला दे साक्षी
रक्ताची पी ओंजळ !!

## कठडा

माझें रक्त तुझ्या डोळ्यांत तरळलें
कपाळावर उमललें
उदरांत आकारलें
सकाळच्या वाऱ्याचा विश्वास माझा
माध्यान्हीची वणवण
...मावळतीचे निःश्वास...!
ह्या साऱ्यांना :
साथ तुझ्या बोलक्या कंकणांची...
रक्त जेव्हां गदगदते; तेव्हां.
क्षितिज उतरतें माझ्या थरपावलांत
माझ्या उल्केला पुरतो आधार
तुझ्या डोळ्यांत तरळणाऱ्या कठड्याचा !

—केशव मेश्राम

चार हजार पौंड जमा केले. ते पैसे अखेर परत मिळाले नाहींत पण पोलिसांच्या धीम्या प्रयत्नांनी कित्येक महिन्यांनंतर दोन्ही चोर मात्र सांपडले व त्यांना सजा झाली. या कल्पक पण अहिंसक गुन्ह्याच्या अगदीं उलट स्वरूपाचा खुनाचा गुन्हा, त्याबद्दलच्या एका इतिहास प्रसिद्ध खटल्याचेंही येटसनें वर्णन केलें आहे. डॉक्टर क्रिपेनची केस म्हणून ती गोष्ट अजूनही आठवणींत आहे. एका वेंदू डॉक्टरनें स्वतःची सेक्रेटरी असलेल्या पोरीशीं लग्न करण्यास मिळावें म्हणून बायकोला मारून तिचे तुकडे करून तळघरांत पुरले व वोम चुन्याची पोतीं ओतून खड्डा पुन्हां सारखा करून ठेवला; पण त्यानें एक चूक केली, कोरड्या चुन्यानें शरीराच्या कुठल्याही भागाचा महिन्यानंतर मागमूसही राहिला नसता, पण क्रिपेननें चुन्यांत पाणी ओतल्यामुळें शरीराचे तुकडे शाबूत राहिले व कालांतरानें पोलिसांना शोधून काढतां आले. सेक्रेटरीला पुरुषाचा वेष देऊन क्रिपेन बोटीनें अमेरिकेला पळून गेला होता, पण त्या दिवसांत नुकताच शोध लागलेल्या बिनतारी संदेशानें बोटीच्या कप्तानाला सूचना देता आली व दुसऱ्या बोटीनें अगोदर पुढें जाऊन टपलेल्या पोलिसांनी खुनी माणसाला न्यूयॉर्क बंदरांत पोहोंचतांच पकडले. कोर्ट-खटल्यांखेरीज कायद्याच्या जगांतील इतरही कांहीं गोष्टींची दखल बेरीनें घेतली आहे. उदाहरणार्थ तीन आठवडे अर्धी पाठ्यपुस्तकें नुसती तोंड पाठ करून बॅरिस्टरीच्या परिक्षेंतून तो कसा पसार झाला, ट्रस्टी किंवा विश्वस्त ही किती मोठी जबाबदारी आहे—व मोठमोठ्या इस्टेटी चोर किंवा मूर्ख विश्वस्तांमुळें कशा धुळीला मिळतात, इत्यादि.

सुमारें अर्ध शतक जीवनाचे सर्व प्रकार पाहिल्यानंतर ठळक जुन्या आठवणी सांगताना, गेले ते दिवस सोन्याचे होते, तसे दिवस पुन्हा येणार नाहींत, हा सूर येटस्च्या निवेदनांत जाणवतो व बेरी तर ठामपणेंच तसें म्हणतो. पहिल्या महायुद्धापूर्वीचें जग संथपणें चालणारें, समाधानी व समृद्ध होतें, आपापल्या स्थितींत संतुष्ट राहून वांट्याला आलेलें काम इमानानें करीत लोक सुखानें कालक्रमणा करीत होते. लंडन ते इस्तंबुल पर्यंत प्रवास करण्यासाटीं देखील पासपोर्ट लागत नव्हता, पांच पौंडांत स्विझर्लंण्डमध्यें आठवडाभर बादशाही आरामांत राहण्यास मिळत असे, तीन रुपयांत उत्तम ग्रंथ (किंवा हवी असल्यास उत्तम व्हिस्कीची बाटली) मिळे.वस्तू बनविणाऱ्या लोकांना आपल्या कारागिरीचा अभिमान असे. कोणी कोणाचा हेवा करीत नसे व लंडनसारख्या ठिकाणीं जरा आडबाजूच्या घरांतून वर्षानुवर्षें चित्रकार फुकट राहूं शकत, अशा प्रकाराच्या आठवणी बेरीनें नोंदविल्या आहेत. त्यानें एक भुताची गोष्टहि सांगितली आहे. एका जुन्या घरांत पाहुणा गेलेल्या माणसाला मध्य रात्रीं भिंतीतून पलीकडे गेलेला एक मनुष्य दिसला. नंतर दुसऱ्या दिवशीं दिवाणखान्यात त्याची तसबीर दिसली, तेव्हां हा कोण म्हणून विचारतां कळलें कीं तो एक पूर्वज असून घरांत मृत्यु होण्याच्या अगोदर तो दिसतो. पाहुणा कांहीं बोलला नाहीं. एक दोन दिवसांतच यजमानाचा अत्यवस्थ असलेला बाप मरण पावला. येटस् व बेरी दोघांनाहि जर्मनांबद्दल वीट व फ्रेंचांबद्दल तिरस्कार असल्याचें स्पष्ट दिसतें. जर्मनांच्या असंस्कृत व पशुसदृश वागणुकीची उदाहरणें बेरीनें दिली आहेत व येटस्नें गेल्या महायुद्धानंतर फ्रेंचांनीं ब्रिटिशांशी वैर धरलें हा सिद्धांत मांडला आहे. त्याने दाखविलें आहे कीं नाझींना फ्रेंच लोक शरण गेले पण ब्रिटिश मात्र लढत राहिले. त्यामुळें फ्रेंचांची मानहानि झाली, त्याचा डूग त्यांनी ब्रिटिशांवर धरला. नाझींच्या अमलाखाली फ्रान्समधल्या लोकांची चंगळ झाली, सर्व मालाला किंमत मिळाली. शरणागति फायद्यांत पडली. मूठभर, अक्षरश 'बिन्दु शून्य शून्य एक' इतके टक्के फ्रेंचमेन जर्मनांचा प्रतिकार करीत होते, बाकीच्यांना जर्मन हे उत्तम गिऱ्हाईक मिळालें होतें. पुन्हां लढाई जिंकायला अमेरिकन जे आले तेच अमाप पैसा घेऊन, आणि नंतर लढाई थांबल्यावर सैन्यातून मिळेल तो माल घेऊन फरारी होणाऱ्या हजारो अमेरिकनांनीच फ्रान्समध्यें

अनुक्रमणिका








काळ्या बाजाराला तेजी आणली, तेव्हां तेहि फ्रेंचाना जर्मनांइतकेंच भाई भाई वाटले. पण ब्रिटिशांनी मात्र जर्मनांना एकाकी लढाई देऊन जगांत मान मिळवला आणि त्यामुळें आपली शरणागति अधिकच नामुष्कीची ठरली हें शल्य फ्रेंचांना सलत राहिल्यामुळें या युद्धानंतर कित्येक वर्षें फ्रेंचांना ब्रिटिश डोळ्यापुढें नको होते. युद्धापूर्वीं दक्षिण फ्रान्समध्यें चैनीसाठीं बंगले बांधून राहणारे ब्रिटिश लोक युद्धानंतर तेथें गेले तेव्हां फ्रेंचाच्या खुनशी वागणुकीमुळें त्यांना लौकरच केव्हां या देशातून जातो असें होऊन ते स्वदेशी परतले, ही त्यांच्या स्वानुभवाची हकीकत येथें आहे.

बेरीच्या मुखानें दोन आधुनिक खुळांवर येटस्नें जे ताशेरे झाडलें आहेत ते मार्मिक व चटकदार आहेत. बनवाबनवीचे प्रकार म्हणून मानसशास्त्र (सायकॉलॉजी) व नवकला (मॉडर्न आर्ट) या विषयाची तो चर्चा करतोः पूर्वी शिस्त ही गोष्ट होती, मानसशास्त्र नव्हते. नाठाळ पोरांना शिस्तीने वठणीवर आणण्यांत येत असे, आतां तशी मुलें प्रमेय बालकें (प्रॉब्लेम चिल्ड्रन) ठरतात आणि मानसशास्त्रज्ञ त्यांच्याबद्दल सल्ला देतात. प्रौढांनाहीं भरपूर फी घेऊन मानसशास्त्रज्ञ उपचार करतात. मनोविश्लेषणाचा आणि तसल्या थोतांडांचा उदोउदो होऊन शहाणेशहाणें त्याला माना डोलावतात व तज्ञ डॉक्टरदेखील मूग गिळून मान्यता देतात, इतकें खोटेपणाचें साम्राज्य मध्ययुगीन पाद्रीच एक पसरूं शकत होते. माणूस काय आहे एवढें ओळखणें, इतकें मानसशास्त्र बस झाले, बाकी सगळा फाफट पसारा आहे! दुसरी बनवेगिरी आधुनिक कला. प्राचीन काळापासुन तो थेट १९१० पर्यंत कलेची स्वरुपें प्रस्थापित झालीं होतीं. निसर्गातलें सौंदर्य टिपून तें शिल्पांत किंवा रंगांत उतरविणें, मनाला जें परम मंगल वाटत असेल त्याला नम्रपणें व श्रद्धापूर्वक मूर्तस्वरूप देणें हा कलेचा अर्थ होता. सृष्टीची प्रतिबिंबे दाखवण्यांत कोणी उत्तुंग यश मिळविले, बाकीचे आपापल्यापरिनें पराकाष्ठा करीत राहिले. येत नाहीं किंवा साधत नाहीं म्हणून कलेलाच विद्रूप करण्याचे कोणाला सुचलें नव्हतें. १९१२ मध्यें बेरीनें पहिलें आधुनिक कलाप्रदर्शन पाहिलें व त्याला आपला अपमान झाल्याइतका राग आला! मनाला मोठा धक्का बसला आणि मग हॅन्स अण्डर्सनच्या एका गोष्टीची आठवण झाली. तोंडपुज्या दरबारी मानकऱ्यांनी राजाच्या अंगावरच्या काल्पनिक कपड्यांची तारीफ केली. राजा विनकपड्यांचा मिरवणुकीत निघाला–आणि रस्त्यातल्या एका बालकानें 'अरे राजा नागडा' हें सत्य उच्चारल्यावर त्यालाही त्याचा साक्षात्कार झाला! दुर्दैवानें असें सत्य नवकलेबाबत वेळींच एकाद्या अर्भकानें उच्चारले नाहीं–कीं 'अरे मी काढतों तसंच हें चित्र!' १९४० च्या जरा आधींच्या टाईम्सच्या फायलींत एक हकीकत सांपडेल: एक माहितगार कला-समीक्षक न्यू यॉर्कच्या एका प्रसिद्ध चित्रमहालांत गेला असतां, त्यानें कांहीं महिन्यांपूर्वी पॅरिसमध्ये आडवें पाहिलेलें एक आधुनिक रंग-चित्र उभें लावण्यांत आलेलें दिसलें आणि कित्येक महिने कोणाच्या हें लक्षांतही आलें नव्हतें!

लेखक म्हणून स्वतःचे अनुभव येटस्नें प्रसंगे पात्त श्रोटकपणें सांगितले आहेत. तो यशस्वी झाला तेव्हां 'तुमच्या पुस्तकांत मीं लिहिलेला भाग आहे' म्हणून पत्र लिहून पैसे काढूं बघणाऱ्या व्यक्ति त्याला दोनदां भेटल्या पण त्यानें दाद दिली नाहीं. (उलट एच्. जी. वेल्सला मात्र एक वाईट अनुभव आला. कॅनडामधून एका बाईनें लिहिलें कीं 'मागें मीं तुम्हांला अभिप्रायासाठीं एक टाइप केलेली कादंबरी पाठवली होती. त्यानंतर आतां तीच कादंबरी तुमच्या नांवावर प्रसिद्ध झालेली पाहिली' वेल्सनें पत्राकडे दुर्लक्ष केलें आणि कांहीं दिवसांनीं कॅनडामधील कोर्टानें त्या बाईचा खटला एकतर्फी चालवून मंजूर केलेल्या नुकसान भरपाईची नोटीस वेल्सवर आली! त्याला निष्कारण कॅनडांत जाऊन पुन्हा खटला लढवावा लागला व जरी त्यानें बाजू जिंकली तरी त्याला एकूण तीन हजार पौंड खर्च आला. त्या बाईनें वेल्सची सबंध कादंबरी पुन्हा टाइप केली होती. व तिची कार्बन प्रत कोर्टात पुरावा म्हणून दाखल केली होती. येटस्च्या) एका सबंध कादंबरीची भाषा एका फाजिल उत्साही मुद्रकानें 'सुधारली' व मुद्रितें वगैरे व दाखवतां एकदम सबंध पुस्तकाचें शेवटचें मुद्रितच त्याच्याकडे पाठवलें. येटस्नें तें सबंध रद्द करून पुन्हा आपल्या मूळ लेखनाप्रमाणें, जुळविण्यास मुद्रकाला भाग पाडलें. टीकाकारांनीं त्याच्यावर फारसा अन्याय केला नाहीं, फारतर एकानें म्हटलें कीं याच्या विनोदी गोष्टीतलीं पात्रें दरवेळीं स्वतःच जास्त हांसतात. त्याच्या साहसकथांबद्दल कांहींनीं 'अशक्य' असा अभिप्राय दिला, पण एका वाचकानें त्याला लिहिलें कीं 'बुद्धी, कर्तबगारी, धैर्य, शक्ति आणि पैशाचें पाठबळ इतके असल्यानंतर तुमच्या साहसी नायकांनीं ज्या ज्या बहादुऱ्या केल्या आहेत त्या कोणीही करूं शकता. तुमच्या पुस्तकांत प्रत्येक गोष्टीचा खुलासा असतो त्यामुळें त्या पूर्ण पटण्यासारख्या असतात.' आपली भाषा उत्तम इंग्रजी असावी याचा येटस् विशेष कटाक्ष बाळगतो आणि प्रयत्नपूर्वक खरें. पण यशस्वी असें भाषासौष्ठव त्यानें प्राप्त करून घेतलेलें दिसतें. तो आपल्या कादंबऱ्या आंखून लिहीत नसे, कल्पनेच्या मागें तो लिहीत जाई व पुनः पुन्हा परत येऊन कथानकाचा प्रवाह तर्कशुद्ध ठेवण्याची खबरदारी घेई.

आज समाजवाद हा जिथें राजधर्म आहे अशा जगांत येटसची विचारसरणी हुजूरपक्षीय, परंपरावादी, उमरावशाहीला अनुकूल, साम्राज्याभिमानी व आत्मसंतुष्ट वाटेल; ज्याला 'गडद निळा टोरी' म्हणता येईल असा ब्रिटिशर तो होता. त्याला इंग्लंड, इंग्रज आणि इंग्रजी यांच्याबद्दल पराकाष्ठेचें प्रेम होतें. पण जुनी घडीच जास्त चांगली होती, समता ही कल्पना अनैसर्गिक आहे, बंधुभाव असूनही उच्चनीच अवस्था अनिवार्य असतात आणि स्वतंत्र देशांतही निवडक वर्गाच्या आणि परंपरागत संस्काराच्या लोकांकडे नेतृत्व असावें अशा–प्रतिगामी या सदरांत येण्यासारख्या–त्याच्यानिष्ठा होत्या. तथापि मतें कशीही असलीं तरी तो एक उत्कृष्ट लेखक होता हें मात्र त्याच्या तीस वर्षांच्या लोकप्रियतेनें सिद्ध केलें आहे. त्याच्या प्रकाशकांनीं त्याच्या पुस्तकांच्या वेष्टणावर लिहिलेलें खरें आहे, कीं 'ज्याचीं पुस्तकें एकदां वाचल्यानंतर लोक पुनः पुन्हा वाचतात'

• • •







अनुक्रमणिका



*“ आला आला रुखवत. हलग्या शिंग्यांचा उडला थाटमाट, आंत उघडून बघतें तर बडामाचं ताट.........” लग्नाच्या ऐन मोसमांत* **डॉ. सरोजिनी बाबर** *यानीं सांगितलेली रुखवताची ही अजोड कथा—*

# राहि - रुक्मिणी

**आ**मच्या आईनं वाडीवरल्या आज्जीकडे जाऊन त्यांच्या मळ्यांतील फुलांची कोथींबीर घेऊन ये तरच वाटली डाळ करीन म्हणून मला घरांतून बाहेर पिटाळली. म्हणून मग मी रमत गमत हातांत एक मोठं चिपाड घेऊन गोठ्या-वरून वाडीला जाणारा रस्ता धरला. बरोबर कोण नव्हतं. रेडी चरायला आणली असती तरी बरं झालं असतं. पण लक्षांतच आलं नाहीं. पाठींत धपाटा मारून आईनं मला जी दिंडी दरवाजांतून बाहेर फेकली ती मी थेट पळत सुटलें. वाटली डाळ खाईन तरच नांवाची असा मी पण हट्ट धरला होता आणिक त्यासाठीं आज्जीच्या घरीं मी चाललें होतें.

वाटेनं जातांना हातांत धरलेलं चिपाड खडखडत होतं आणि ओठांत आज्जी दिसल्याबरोबर आईबद्दलची कागाळी कशी सांगायची त्याची बाराखडी घुमत होती. म्हणून झपाट्यानं मी पायाखालची वाट तुडवीत होतें. त्या कारणानं हां हां म्हणस्तोवर वाटेवरचा उपसमियाचा दर्गा मागं पडून वाडीची पाऊलवाट माझ्या नजरेंत आली होती. आणि तेवढ्या एका आशेवर आज्जीच आतां वाटली डाळ करून देईल या खात्रीनं जीभ ओली होऊन वळवळत होती. त्या नादांत पळत जाऊन मी आज्जीचं घर गाठलं तर दारांतच कुणाचा तरी भला दांडगा आवाज आला—

‘ आला आला रुखवत. मांडवाच्या दारीं आला कालापाला. नवरा नवरीचा जल्म झाला. खरं का खोटं ते बरम्याला पुसा. बरम्यानं सांगितली काचबंदी न्हानी. आंत भरलं गंगामाईचं पाणी. यिहीन न्हाली राती. भांग भरून घातले मोती. हातीं चंदनाची फणी. कुंकू ल्याली चौकोनी. त्याला मोतीं बशीवले बागदानी. यिवाय पावना गेला इंद्राच्या सभ. केली काशीबनारशी. आला गंधारीला पुसून. रामचंद्राला विचारून. तर यिहीन बाई तुमी आमच्या वाड्याला या. पायघड्या घ्या. हळदकुंकू ल्या. वटीचा मान आमाला तुमी द्या न् मग रुखवत उघडायला पुढं या. ’

म्हटलं, आज्जीच्या घरांत लगीन कुणाचं बाई निघालं न् रुखवत कुणाचा आला ! मला बाई भारी नवल वाटलं. म्हणून मी लपत छपत आपली मागच्या दारानं मळ्यांत गेलें. बिंडाभर कोथमीर तोडली आणिक घरांत येऊन जेवावं म्हटलं तर पुन्हां आपलं कोणतरी बारीक गळ्यानं बोलतेलं—

‘ आला आला रुखवत–हलग्या शिग्यांचा उडला थाटमाट. आंत उघडून बघतें तर बडामाचं ताट. दोनशें खांडवा न् कापऱ्या तीनशें साठ. उघडली दुसरी दुरडी आंत दिसला गुलालाचा भार न् व्याही मिळाला मोठा हौसदार. तिसरी दुरडी उघडली. आंत दिसले हळदकुंकवाचे पुडे न् रुखवत उघडावा म्हटलं आया–बायांच्या पुढें. चौथी दुरडी उघडली. दिसली करंज्याची नवलाई. रुखवत उघडूं दे म्हटलं नवऱ्याचे वरमाई. पांचवी दुरडी उघडली. निघाली केळाची फणी. रुखवत उघडायला आल्या नवऱ्याच्या बहिणी. साव्वी दुरडी उघडली. शेवायाची चवड निघाली. रुखवत उघडायला मानापानाचीं आलीं. सातवी दुरडी उघडली. साखरेचीं चित्रं दिसलीं. रुखवत उघडतांना मावळन हंसली. आठवी दुरडी उघडली. निघाले केळी नारळांचे घड. रुखवत उघडायला येतांना भावजयीनं चढला पन्हाळगड. नववी दुरडी उघडली. निघाल्या चोळी लुगड्यांच्या घड्या. रुखवत उघडायला आल्या पोराबाळी चिमखड्या न् संगं मानांच्या यिहिनी बड्या. वाजला वाजंत्र्यांचा ताफा. गणगोतांनीं भरला सोपा. हरली तहानभूक. निघाली एवढ्यातनंबी काय चूक तर करावी माफी आपसूक. ’

आणिक हें ऐकत मी वळचणीखालीं उभी तर तेवढ्यांत शेरडीनं कोथमीर पाक खाऊन टाकलेली ! आतां काय करूं देवा ! मी हें भोकाड पसरलं तशी आज्जी धांवत बाहेर आली न् तिनं मला पोटाशी धरून विचारलं, ‘ माजी दुधावरची साय कवा न् कशी आली ग तरी ! ’

(पान ५१ वर)

अनुक्रमणिका

*तिनं त्याला बक्कळ मारलं. त्यामुळें पोरगं रुसलं आणि आगिन गाडीच्या रुळांवर जाऊन बसलं. तिकडून धडाक् धडाक् करीत गाडी आली आन्....*






झक पैकीं उजाडलं होतं. गाईच्या गोठ्यांत आई झाडलोट करायला गेली होती, व मी तोंडावर रग घेऊन अंथरूणांत पडलों होतों. पांढऱ्याधोट रंगाच्या टिकल्या मोजीत होतों. शेजारच्या पारीनंच मला ही गंमत दाखविली होती. काल ती पळत माझ्याकडं आली होती व धापा टाकीत मला म्हणाली होती, 'सोन्या, तुला एक गंमत बगायची कां रं?' मी तिच्या हाताला धरून म्हणालों होतो, 'चल बरं, दाखव बरं' आणि मग तिनं मला आपल्या घरीं नेलं होतं. आपल्या अंथरूणांत घेतलं होतं, व तोंडावर रग घेऊन तिच्याकडं डोळे लावून पाहायला सांगितलं होतं. पांढऱ्या धोट रंगाच्या टिकल्या दाखविल्या होत्या. तेव्हांपासून मला ह्या टिकल्यांनीं वेडच लावलं होतं. जरा इकडून तिकडून आलं कीं, मी तोंडावर रग घेत होतो व पांढऱ्या टिकल्या मोजीत अंथरूणांत पडत होतों. आतांहि त्या टिकल्या मोजीत असतां आई लगालगा चालत आली. माझ्या अंगावरची रग खसकन ओढून घेत म्हणाली—

'ऊठ की माज्या वयऱ्या! मेल्या परडावानी कंवर घोरतोस?' तिच्या आवाजावरून मी ओळखिलं कीं, आई आतां चांगलीच रागावली आहे. आतां आपण चार-दोन धपाट्याला महाग नाहीं. मी तटकन् अंथरूणावर उठून बसलों. सलगीच्या स्वरांत आईला म्हणालों—

'आये, आतां मला एक सपन पडलं ग!'

माझा कान पिरगाळीत आई म्हणाली—

'तुला बरं जंवा तंवा सपन पडतं रं!'

सदऱ्याची कॉलर बोटाच्या चिमटींत धरीत मी म्हणालों—

'ह्या गळ्याच्यान की ग आई! मला खरं खरं सपन पडलं'

मी असं शपथ घेऊन बोललों तेव्हां आईला माझं म्हणणं खरं वाटलं. ती खालीं बसली व मला जवळ घेऊन म्हणाली—

'कसलं सपन पडलं रं वासरा तुला?'

काल आई शेण गोळा करायला गेली होती. तिच्यासंग हावळाची सरसी होती. दोघींहि शेण बघत बघत चालल्या होत्या. एवढ्यांत आईनं एक शेणाचा पोव पाहिला व जो सरसीनं पळत जाऊन घेतला. तेवढ्यावरून दोघींचं भांडण लागलं. वाढत वाढत खूप वाढलं पण सरसी होती कळबंड. ती कांहीं केल्या आईला आवरेना. तिच्या झिंज्या धरून खसाखस खसाखस ओढूं लागली. आई घाबरली. चांऽगल पटाभर पळत गेली आणि मग फिरून ती ठासून म्हणाली—" जरा दम धर ग सरसे. आतांशीक माजं पोरगं शिकाया लागलंया. शिकून एकदां त्याला एकादा कामदार हूदे, मंजी मंग कसं काय ते दावते तुला ! ' मला हा सारा प्रसंग आठवला. मी आईच्या समोर व्यवस्थित उभा राहत म्हणालों–

' आये, म्या का न्हाय ग; बक्कळ शिकलों. शिकून शिकून हवालदार झालों. मंग संगं चार पोलीस घेतले. आपल्या गांवाला आलों. तुज्या त्या सरशीला बोलावून घेतलं आन् आईसंगं कां भांडलीस म्हणून सपासप तिला मारलं बग. '

' कसं मारलस ? अजून एकदां सांग बरं ' आईनंच मला अधिकच जवळ घेत व उल्हासलेल्या नजरेनं माझ्याकडं विचारलं.

मी हवेंत हात मारीत म्हणालों–

' सपासप सपासप मारलं बग '

हाताची मुठ आवळीत व डावा डोळा बारीक करीत ती म्हणाली–' बरं केलंस. तसंच फायजी त्या अवदसाला. काल ती लई भांडलीया माज्यासंग '

हातावरच्या रेषा पाहात मी म्हणालों–

' आये, म्या तिला खरं न्हाइ मारलं. सपनांत मारलं बग. '

आई भानावर आली. हाताची मूठ सोडीत म्हणाली–

' ऑ, असं झालं व्हय ! ' आणि थोडं थांबून ती परत म्हणाली–

' बरं असूं दे. तूं कंवानाबंवा व्हसीलच हवालदार. तंवा चांगलं सडकून काढ तिला. जा, आतां कर जा अभ्यास. '

अलामला घेण्यासाटीं तोंडाजवळ आलेला हात झिंजाडींत मी म्हणालों–

' आग चल हॅट. आतांच आभ्यास करतेत का ? आज तर आमचं पास नापास कळणार कीं ! '

' आरं मंग जा की साळंत, बगून ये काय झालं ते '

' आतां साळा तरी उघडली असंल का ? थोड्या वेळानं उघडंल मंग जाईन. '

दटावणीच्या स्वरांत आईनं बजावलं—

' जा अन् पास झालों म्हणून सांगायला ये मला. नापास बिपास झालास तर एक हाड ठिवायची न्हाई जाग्यावर. हं, सांगून ठिवते."

" आग चल हट म्या नापास व्हाया बसलोंय. यंदा पास हूनच दावीन तुला "

" हूं बाबा, तूं जरूर पास हू." बोलता बोलतांच आईच्या गळ्यांत हुंदका दाटला. डोळ्यांत पाणी तरारलं. मला तिनं आवेगानं छातीशीं आवळून धरलं व भरून आलेल्या आवाजांत ती म्हणाली–

" तुजा बाप असता तर त्यानीं बक्कळ शिकवलं असतं, मोठा कामदार केलं असतं तुला. पर म्या रंडीमुंडी बाई. म्या मिळवूं किती आन् तुज्या शिकसेनाला पुरवूं किती !" आईला पुढं बोलतांच येईना. ती थोडं थांबली व नाक शिंकरून परत म्हणाली—

" एवढं न्नी हाय, पर तूं शिकायचं टाकूं नकुस. मी चिंधी चांधी नेसंन. आरधपोटी न्हाईन आन् तुला पैसा पुरवीन. तुला एकदां एकादा कामदार ' झालेला बगूं दे ' म्हंजी मंग माजी सारी आमना फिटंल."

**श्री. रा. रं. बोराडे**

पुन्हां तिचा गळा दाटला. बोलायची इच्छा असूनहि तिला बोलतां येईना. तिच्या डोळ्यांतून घळाघळा पाणी वाहूं लागलं. पुन्हां पुन्हां पदरानं नाक पुसून लालेलाल झालं. मला नाहीं हें आवडत आईचं. ती जेव्हां तेव्हां मला जवळ घेते व उगीचच रडत बसते. आईला असं रडतांना पाहिलं कीं, मला सपाटून भूक लागते. आतांहि आइला तसं रडतांना पाहिलं आणि एकाएकी पोटात खड्डा पडला. मी हातपाय झाडीत म्हणालों–

' आये, चल, जेवायला दे मला '

गुढघ्यावर हनुवटी टेकवून आई बसली होती. कांहीं तरी हरवल्यागत समोर पहात होती. मी असं म्हणालों, तव्हा ती भानावर आली व नाकांतलं पाणी पदरानं टिपीत म्हणाली–

' दुरडीत भाकर असंल. घिऊन खा जा"

चड्डी सावरीत मी घरांत आलों. एक पाय जात्याच्या खुंट्यावर ठेवला. एक पाय दिवळीत ठेवला व शिंक्यावरची दुरडा उतरून खालीं घेतली. ताटांत अर्धी तीनकोर भाकर कुस्करली. वर निरस दूध ओतून घेतलं व डोक्यावर ताट ठेऊन मी माळवदावर गलो. उन्हाला बसून तोडांचा आवाज काढत जेवलों.

जेवण झाल्यानंतर मी खालीं आलों. खरकटं ताट आईपुढं आदळीत म्हणालों—

' आये, म्या साळंत चाललों, बग '

एवढा वेळ आई चिंतागती बसली होती. माझ्या बोलण्यानं ती लटकन् दचकली व काळजीच्या स्वरात मला म्हणाली–

' लवकर ये म्हागारी आन् वाटंत कुनाला खवळाढवळ करीत बसूं नकूस. कळाल्या कळाल्या ये मला सांगायला.'

मी कांहीं न बोलतांच उड्या मारीत बाहेर आलों व दुडक्या चालीवर पळत निघालों. सुतारआळी ओलांडली. बापू वारकाचं घर मागें टाकलं आणि कोळ्याच्या घराजवळ आलों तव्हा समोरून जाधवाचा बाबुश्या येतांना दिसला. ढोपराला पाय लावीत तो भणाण पळत येत होता. भडवा दिसतो एवढाएवढासा, पण पळतो फार. आगीनगाडीला देखील मागं टाकीन म्हणतो. त्याची खोडकी मोडायचा विचार बऱ्याच दिवसापासून माझ्या मनांत होता. मला ही संधि झकक वाटली. मी रस्त्याच्या मधोमध थांबलों. कांहीं तरी हरवल्यागत शोधीत राहिलों. बाबुश्या पळत पळत आला. माझ्याजवळून जाऊं लागला. मी पटकन् आडवा पाय घातला. बाबुश्या रपकन् तोंडावर आदळला. त्याचा खालचा ओठ फुटून रक्तबंबाळ झाला.

मी तिथून सटकणार एवढ्यांत बाबुश्याच्या गल्लीतला एक पोरगा मला आडवा झाला. खवळलेल्या बोक्याच्या नजरेनं









माझ्याकडं पहात म्हणाला—

'का पाडलंस रं त्याला ?'

'मी कंवा पाडलं ?' मी शक्यतो निरपराध चेहरा ठेवण्याचा प्रयत्न केला.

'अं, अं ह्येनंच पाडलं मला. म्या पळत चाललों व्हतों. ह्येनं आडवा पाय घातला' बाबुऱ्या रडत रडत म्हणाला.

'व्हय रं, खरं का ?'

मी गप्प बसलों.

'सांगतोस कां बगाचंय तुला ?' माझ्यावर हात उगारीत तो म्हणाला.

एवढ्या वेळांत बाबुऱ्याच्या गल्लींतलीं तीन-चार पोरं गोळा झालीं होतीं. खाऊं कीं गिळूं अशा नजरेनं माझ्याकडं पहात होतीं.

मी एक घुटका गिळला. आतां आपली धडगत नाही हें ओळखिलं. त्यांतल्या म्होरक्याच्या खांद्यांवर हात ठेवीत मी म्हणालों—

'तिकडं चल जरा'

माझा हात झटकून टाकीत त्यानं विचारलं—

'कां ?'

'एक गोष्ट सांगायचीय तुला'

'हितं सांग'

'तिकडं यायला भितोस ?'

'म्या कुणाला भेत न्हाई'

'मंग का येत न्हाईस ?'

मी असं हिणवलं तेव्हां त्यानं सोबतच्या पोरांना खुणावलं व नंतर मला म्हणाला—

'चल येतों.'

मी त्याला बरोबर घेऊन निघालों. थोडं दूर गेल्यावर मी थांबलों. त्यानं विचारलं—

'कां थांबलास रं ?'

'कांटा काढतों पायांतला'

'काढ'

मी खालीं वांकलों. उगीचंच तळव्याखालीं हात फिरवूं लागलों. मध्येंच मी नजर उचलून त्याच्याकडं पाहिलं. त्याची नजर माझ्यावरच रोखलेली होती. मी एकदम ओरडलों—

'ते बग काय चाललया ते'

मी दाखविलेल्या दिशेला तो पाहूं लागला. मला ही संधि मस्त वाटली. मी एकदम त्याचा पाय ओढून खालीं पाडलं. मेलेलं कुत्रें ओढावं तसं दहा पांच पावलं ओढीत नेलं. आणि मग त्याला तिथंच सोडून नेटानं पळत सुटलों. जिकडं रस्ता फुटेल तिकडं पळत सुटलों. मध्येंच मी मागं वळून पाहिलं. ते चौघेहि माझ्यामागें पळत येत होते. क्षणाक्षणाला त्यांच्यांतलं व माझ्यांतलं अंतर कमी कमी होत होतं. आतां मात्र माझी धडगत नव्हती. कांहीं तरी करून त्यांना गुंगारा द्यायला हवा होता. मी मुख्यरस्ता सोडून बोळांत शिरलों व समोरच्या घरांत घांवलों. एका कोपऱ्यांत दडून उभा राहिलों. माझी छाती धडधडत होती व अंगावर घाम फुटला होता. माझे कान मात्र रस्त्याकडं होते. एवढ्यांत पावलांचा आवाज आला. व तो तसाच पुढें गेला. मी सुटकेचा निश्वास सोडला आणि सहज समोर पाहिलं. समोरच्या न्हाणींत सोठाची बायडी आंघोळ करीत होती. गरम पाण्याच्या वाफा तिच्या साऱ्या अंगावर उठत होत्या. व त्या वाफेंतून तिचं गोरं गोरं अंग चमकत होतं. सोठाची बायडी माझ्याच वर्गातली, अगदीं परवां परवांपर्यंत ती शाळेंत येत होती; पण अलीकडे तिनं शाळेंत येणं बंद केलं होतं. मी आईला विचारलं तेव्हां ती म्हणाली–'आरं आतां ती–'शानी' झालीया.' कसलं ढेकळाचं शहाणपण आलंय् तिला. वाचायला लावलं तर नाकाला जीभ लावीत सुटते व लिहावयाला सांगितलं तर एका वाक्यांत दहा चुका करून ठेवते. अशा पोरीला शहाणं कोण म्हणेल ! पण लोक असं म्हणूं लागल्यापासून तर ती जास्तच तोऱ्यांत आलीय्. रस्त्यानं निघालं म्हणजे कडेकडेनं काय चालते, शेळीनं पाला ओरबाडल्यावानी नजर काय फिरविते, एखादं पोरगं बोलूं लागलं तर लाजून लाल काय होते, साबणाच्या फेसावनी हंसत काय सुटते, भलताच नखरा वाढला आहे. तिला अद्दल घडवायचा विचार बऱ्याच दिवसापासून माझ्या मनांत घोळत होता. मला ही संधि छान वाटली. पावलांचा आवाज न होऊं देतां मी तिच्या पाठीमागून गेलों. खुंटीवर ठेवलेलं तिचं लुगडं काढून घेतलं व जवळच्या कणगींत सोडलं व काय होतंय ते पाहाण्यासाठीं आडमोरी जाऊन जाऊन उभा राहिलों.

बायडीनं आंघोळ संपवली. ओलं लुगडं पिळून खसाखसा अंग चोळलं. लुगड्यासाठीं मागं हात लांबविला व हाताला लुगडं न लागतांच ती दचकली. गरकन् मागं वळून तिनं पाहिलं आणि खुंटीवर लुगडं न दिसतांच ती खूप भ्याली. छातीवर हात बांधून ओरडली–

'आये आगं आये'

बाहेर येत तिच्या आईनें विचारलं—

'कां ग ?'

'माजं लुगडं कुठ हाय ?'

'कुठं ठिवलं व्हतंस ?'

'हिथं खुंटीवर तर व्हतं'

'मंग काय झालं ?'

'कुणाला ठांव !'

'दोडा तुला कसं ठांव न्हाई ? का नेलं वडून ?'

'म्या आंघुळ करीत व्हतें. म्या मांगं बगाया न्हाइ'

'अशी कशी आंघुळ करीत होतीस गं ! जवळ ठिवलेलं लुगडं वडून न्हेलंल कसं ठांव न्हाई तुला ? आसं कसं गिन्यान मातींत गेलं तुझं ?'

बायडी कांहींच बोलली नाही. तिनं मुकाट्यानं मान खालीं घातली. आईनं तिच्या पाठींत एक जोराचा धपाटा मारला व कान पिरगाळींत विचारलं–सांग कीं पाटीमागचं लुगडं वडून न्हेलंल कसं ठाव न्हाई तुला ? कुनाकडं बघत बसली व्हतीस ? आतांशीक वयांत आली न्हाईस तर असे चाळे सुचाया लागलेत. पुढं कसं व्हावं ग तुजं'

आईनं सारखा मारायचा सपाटा लावला तेव्हां बायडी घाबरली. ओलं लुगडं तसंच अंगावर घेऊन ती घरांत पळाली. मला या गोष्टींचा एवढा आनंद झाला की उभारल्याजागीच टुणकन् उडी मारली व स्वतःशीच बोललों–'ऐल पठे ! कशी जिरविली'

सोठाच्या वाड्यांतून मी बाहेर आलों व परत दुडक्या चालीवर पळत निघालों एवढ्यांत समोरून सुताराचा बनस्या पळत आला.






माझ्याजवळ आल्यानंतर थांबून म्हणाला–

'सोन्या, मी पास झालों.'

'पास–नापास कळलं व्हय रं?'

'कळलं कीं!'

'माजं काय झालं?' विचारतांना माझं काळीज धडधडत होतं.

'तूं नापास झालास'

बनस्याच्या तोंडचं वाक्य मी ऐकलं आणि माझ्या पायांतलं अवसान सरलं. आणि आतां आईला हें समजल्यानंतर ती फार संतापणार होती. सारं घर डोक्यावर घेणार होती. गेल्या सालीं मी नापास झालों होतो तेव्हां तिनं संतापाच्या भरांत हिरवं पिवळं होईस्तर मला मारलं होतं. एवढ्यावरच ती थांबली नव्हती तर सबंध दिवसभर ती स्वतः जेवली नव्हती व मला देखील जेवायला दिलं नव्हतं. आजहि पुन्हां त्याचीच आवृत्ति होणार. यंदा त्याहीपेक्षां जास्त शिक्षा मिळणार! कांहीं तरी करायला हवं होतं. तो मी बराच वेळ विचार केला, एवढ्यांत वर्तमानपत्र वाचून दाखविणारा वाळक्या काका माझ्या नजरेसमोर आला. रस्त्यानं मी निघालों कीं, तो हांक मारून मला दुकानांत बोलावून घेतो व नाकाला जीभ लावीत साऱ्या बातम्या वाचून दाखवितो. वाळक्या काकाची नजर चुकवून गुळाच्या टोपल्यांतला खडा तोंडांत टाकतां येत असल्यामुळं मीहि वारंवार त्याच्या दुकानांत जात असतों. बातम्या ऐकत बसत असतों. त्या सर्व बातम्या माझ्या नजरेसमोरून सरकल्या आणि मला योग्य तो इलाज सांपडला. मी पळत पळत वाळक्या काकाच्या दुकानांत गेलों व धापा टाकीत त्याला म्हणालो––

'काका, मला तुजं वर्तमान पत्र देरं'

'कस्याला रं?'

'फायजी, दे लवकर'

'आजचं आलं न्हाई'

'आजचं नसूं दे. कवाचंबी दे.'

माझ्या हातांत वर्तमानपत्र देत काकानं बजावलं––

'लवकर आन बरं'

मी नुसतीच मान हलविली व वर्तमानपत्र खाकेंत मारून धुमाट पळत सुटलों. घराजवळ आल्यानंतर मी वेग कमी केला. चेहरा गंभीर केला व खालीं मान घालून मी आंत शिरलों, थेट आईपुढं जाऊन बसलों.

मला पाहिल्या पाहिल्या आईनं विचारलं––

'काय झालं रं?'

'कशाचं?'

'पास झालास का?'

मी कांहींच बोललों नाहीं. उगीचंच चुलींतल्या जाळाकडं पहात राहिलों. आईनं जास्तच अधीर होऊन विचारलं–

'सांग की लवकर. झालास का न्हाई पास?'

तरीहि मी कांही बोललो नाहीं. आईला मग समजायला हवं ते समजलं. मग तिचा राग उफाळून आला. चेहरा रागानं लालबुंद झाला. तिनं खुंटीचं दावं काढलं. चौपदरी केलं, व मारण्यासाठीं उगारीत ती म्हणाली––

'करनीसरा, कश्याला माज्या पोटी जलमाला आलास? जलमला तंवाच मरून गेला असतास तर बरं झालं असतं, चांगलं गोड धोड करून खाल्लं असतं तुज्या नांवानं.'

दाव्याचा रट्टा आतां पाठीवर बसणार असं दिसतांच मी काखेंतलं वर्तमानपत्र काढलं व जमीनीवर पसरीत म्हणलों–

'आये, मारतीस तर मार पडे, पर हे ह्यांत लिव्हलंय ते आइक अगुदर'

'त्यांत काय डोंबलं तुजं लिव्हलंय व्हय रं!'

'आग आइक तर अगुदर'

आणि तिनं संमती न देण्याच्या आंतच मी त्यांत न लिहिलेलं वाचूं लागलों–

'लातूरच्या साळंमधीं एक पोरगं व्हतं ते चवथींत नापास झालं. त्याला त्याचं लइ वाइट वाटलं. त्यानं हिरींत जाऊन जीव दिला व त्यामुळं त्याचा पराण गेला. त्येच्या मायबापाला बी लइ दुख झालं. त्यानीबी रडून रडून पराण सोडला....'

वाचता वाचताच, मी डोळ्याच्या कोपऱ्यांतून आइकडं पाहिलं आईच्या चेहऱ्यावर हालचाल दिसत होती व उगारलेला तिचा हात खालीं येत होता. मी पुन्हा वर्तमानपत्राकडं नजर लावली व आणखी वरच्या आवाजात मी वाचूं लागलों.

'सोलापूरच्या शाळंत एक पोरग व्हतं. त्यानं बक्कळ अभ्यास केला, घडान्‌घडा पाठ केला. पर काय झालं कुनाला ठाव. ते परिक्षेंत नापास झालं त्याची माय व्हतीं कडक. तिनं त्याला बक्कळ मारलं. त्यामुळं पोरगं रुसलं आन्‌ आगीन गाडीच्या रुळावर जाऊन बसलं. तिकडून धडाक् धडाक् करीत गाडी आली आन्‌ त्याच्या अंगावरून गली. त्याच्या अंगाचा पार चुराडा झाला. त्याच्या आईला त्याचं लई दुख झालं. पोराला मारलं नसतं तर बरं झालं असतं असं तिला वाटाया लागलं. पर उपेग काय ? पोरगं कंवाच मरून गेलं होत.......'

मला पुढं न वाचूं देतांच आईनं घाईनं विचारलं—

'तुजं काय झालं रं बाबा?'

रडवा स्वर काढीत मी म्हणालों–'आये म्या नापास झालों ग'

कपाळावर हात मारीत आई म्हणाली–'आरं देवा! आसं कसं झालं रे देवा!'

मी आणखी रडवा स्वर काढीत म्हणालों–

'आये मला लयी वाईट वाटाया लागलंय ग'

आईनं मला जवळ ओढून घेतलं व समजावणीच्या स्वरांत ती म्हणाली—

'नकुरं बाळा त्यांत काय एवढं वाईट वाटून घ्यायचय!'

'आये, तूं काई म्हन. मला त्या पोरावानी...'

आईनं मला पुढं बोलूंच दिलं नाहीं. तिनं गपकन्‌ माझ्या तोंडावर हात ठेवला. व भरून आलेल्या आवाजांत ती म्हणाली– 'नकुरं लेकरा, आसं काय करूं नकु. यंदा न्हाई तर न्हाई पुढच्या वरसी हुशील पास पर असं काई करूं नकु'

बोलत असतांनाच आईच्या नरड्यांत हुंदका दाटला. माझा अलामला घेत ती हमसून रडूं लागली. मला वरचेवर छातीशीं अधिकच घट्ट अवळून धरूं लागली. असं बराच वेळ झाल्यांनंतर तिची मिठी ढिली पडली. मी नजर उचलून आईकडं पाहिलं. कांहीतरी हरवल्यागत ती बसून होती. अजूनहि तिच्या डोळ्यांतून अश्रूं ओघळत होते. मी अंग आंखडून तिच्या हाताखालून निसटलो. घराच्या मागच्या भागांत आलों. सारख्या आकाराचेचा दगड गोळा केले, चार दिसेला चार फेकले व धाड् धाड् आजवर निघाल्याबरोबर मी न्हाणींत शिरलों. गरम गरम पाणी अंगावर ओतून घेऊं लागलों. बायडीच्या अंगावर जशा वाफा निघत होत्या तशा वाफा आपल्याहि अंगावर निघतात कीं नाहीं तें पाहूं लागलों.

● ● ●



*एखादी व्यक्ति, एखादी घटना, एखादी नवीं हवा अशी कांहीं उफाळ्यानें दिसून जाई कीं ती सांगितल्यावाचून जमत नसे. वर्षोंशीं टिकून राहिलेले शांततेचे शेवाळ विस्कटून जाई आणि—*

# निसटलेले क्षण

—मधुकर केचे

माझे आणि संपादकांचे जेवढें वैमनस्य आजपर्यंत उद्‌भवले नसेल तेवढे किंवा त्याहून अधिक भांडण माझ्या भावना आणि शब्द यांचे झाले आहे. मला लेखकपण येऊं लागलें तेव्हांपासून आणि किंचित् त्याहि आधींपासून माझ्या भावना शब्दांवर नाराज आहेत. रूरलमधले माझे मित्र प्रा. पांजणकर मला नेहमी दिलासा देतात. त्यांच्या आणि तशाच अनेक मित्रांच्या उत्तेजनामुळेंच मी बराचसा स्वस्थ आहे. कवितेच्या बाबतींत लिहायचे हें स्थळ नव्हे; पण इ. स. ५० च्या सुमारास जे नवकाव्याचें वादळ आले त्यावेळीं नुकतीच अंकुरायला आलेली माझी कविता खरें म्हणजे त्याच वेळीं मरायला हवी होती. नव्या प्रगटीकरणातले मला साधा वाचक या नात्यानेहि कांहींच कळत नव्हतें. तेव्हां मीं तसल्या एक दोन असफल रचना केल्यानंतर ‘ शहाणा ’ होऊन कवीपणा सोडणार होतों. माझी मुख्य अडचण ही कीं मला हवा असलेला आकार माझे शब्द घेत नव्हते. त्यामुळें माझीं वाङ्मयीन अपत्यें शेजाऱ्यांच्या मुलांसारखी दिसत होती. अर्थातच गावकऱ्यांच्या तोंडावळ्याची हीं मुलें संपादकांकडे पाठविण्या ऐवजी त्यांना मी घरींच डांबत असे. इतक्यांत अभंग वृत्त मला गवसलें. सहज म्हणून प्रा. ग. त्र्यं. देशपांडे यांच्या पाहण्यांत माझा एक अभंग आला आणि देवदूत एखादा निरोप सांगून जावा त्याप्राणे त्यांनी मला अभंग चालूं ठेवण्यास फर्माविले. स्वतः-हून ‘ छंद ’ च्या संपादकांना पत्र लिहिलें व अभंग तिकडे प्रसिद्धीसाठीं पाठविले कवितेबद्दल हें इतकें लिहायला नको होते; पण कवितेच्या कहाणीसारखीच माझ्या कथालेखनाचीही गत आहे.

झालें काय कीं आपल्या भावनांना साजेसे शब्द व वाङ्मयाचा आकार या बाबतींत माझा सतत गोंधळ अजून चालूं आहे. माझी सर्वांत मोठी इच्छा कथाकर होण्याची आहे. लहानपणी पुस्या इतवारी किंवा उन्हाळ्यांत झोल्या महाराजाच्या तोंडून ऐकलेल्या अनेक कथा मी ‘ जितल्या ’ होत्या. कथा अगदीं तोंडपाठ झाली कीं त्याला आमचेकडे ‘ कथा जितणे ’ म्हणतात. तुकडोजी महाराजांना प्रवचनांत छोट्या मोठ्या कथा सांगण्याची हौस आहे. त्यांची सांगण्यांची ढबहि मोठी ओढ लावू आहे. तशा कथा आपणाला सांगता याव्यात म्हणून मी प्रयत्न केले.

न जमणाऱ्या गोष्टींबद्दल एवढा अट्टाहास मी केलाच का हा प्रश्न मलाहि वारंवार पडतो. सांगणे लिहिणे सोडून किराणा दुकान चालविण्याची एक संधि माझ्या आयुष्यांत आली होती. मी त्यांत रमलोहि असतो पण आयुष्य अचानक सूड घेई. एखादी व्यक्ति, एखादी घटना, एखादी नवी हवा अशी कांहीं उफाळ्याने दिसून जाई कीं ती सांगितल्या वाचून जमत नसे. वर्षोंशी टिकून राहिलेलें शांततेचे शेवाळ विस्कटून जाई आणि तळाशी एखादी समळ भावना गर्भ प्रवेश मागे अशा वेळा माझ्या आयुष्यांत कितींदा आल्या. त्यांनी मला अस्वस्थ केले. अस्वस्थ यासाठीं कीं त्यांना मनाजोगते शरीर मिळेना. सापाच्या तोंडांत अडकलेल्या बेडका सारखी माझी स्थिति अजूनहि तीच आहे. धड लिहिणें जमत नाहीं आणि सोडूनहि देता येत नाहीं. कावरली गाय अन् काटे खाय ही म्हण मला अजूनहि लागू होत आहे. जमो न जमो पण लिहायचेच अशा डुक्कर मुसंडीने मी कथा नांवाचा वाङ्मय प्रकार लिहिला. नियति ही बहुरूपिणी आहे. मी कथाकार आहे अशी मुळी माझीहि खात्री नसतांना माझ्या दोन तीन कथा लोकांना आवडल्या. निव्वळ वऱ्हाडी बोलीमध्यें लिहिलेली ‘ सोयरिकीचे पावने ’ ही कथा सतत कौतुक घेत आहे. लहानशा लेखकाला पांच सहा इंच फुगण्यासाठीं जेवढा मसाला हवा



अनुक्रमणिका

तेवढा मला नियतीने दिला. 'साधनें' त एकदां दिवाळी अंकावर परीक्षण आले तेव्हां माझ्या एका कथेवर तो परीक्षक बरा बोलून गेला होता, त्या नशेने जे व्हायचें तेंच झाले. मग कथा लेखन सोडून देणे अधिकच कठीण होऊन बसले. अशा हेलकाव्यात जेव्हां फार फार दिवसांपासून जपलेले जीवनाचे दोन तीन कण खूप मोठे काहूर निर्माण करतात. तेव्हां तर कांहीं केल्या कथा लेखन सोडवत नाही एखाद्या भल्या मोठ्या चेकचा, आपल्याला तर उपयोग नाही आणि तो फेकूनहि देतां येत नाही. अशी ही स्थितिं आहे.

त्या ज्या घटनांबद्दल मी म्हणत आहे त्या मला लेखन दरिद्री माणसाला दिसण्याऐवजी भाव्यांसारख्या मातबराला दिसल्या असत्या तर त्यांना विविध असे वाङ्मयीन लेणे ल्यायला व नटून थटून वाचकांसमोर यायला मिळालें असतें. शांतारामांसारख्या रथिमहारथि समोर जर त्या व्यक्ति आल्या असत्या तर त्या अक्षरविश्वांत अमर झाल्या असत्या पण घटना आणि व्यक्ति यांना एक खोड आहे. त्या मला जशा दिसतील तशा तुम्हाला दिसत नाहीत. आणि त्या तशा दिसल्याच हा आग्रहहि धरतां येत नाही. कारण त्या घटनेबद्दलची आपली अनुभूति सर्वांना त्याच प्रमाणांत यावी यासाठीं तर लेखनकलेचा जन्म झाला. म्हणूनच त्यांतहि अडचण नेहमीच उद्भवते कीं अमूक एका क्षणाला एका विशेष रूपांत भेटलेला माझा अनुभव ज्याच्या त्याच रूपांत एखाद्या ख्यातनाम लेखकापर्यंत पोहोचविण्यासाठीं लागणारी शब्द संपत्तीच मला मिळत नाहीं. तेवढी जर मिळाली असती तर मग त्या अर्थाने मला स्वतःलाच अभिव्यक्तीचे सामर्थ्य आलें असतें आणि पर्यायाने त्या लेखकांनी जें करायचे तेंच मी केल्याचें दिसून आल्यामुळें मग त्यांच्याकडे जाण्याचीहि गरज हुकली असती. नवशिक्या राउताच्या खाक्यानेच सर्व भावना शब्दांच्या पाटीवरून घसरतात. शब्द असे उधमी आहेत. मग वाचकांपर्यंत अनुभव प्रवासू शकत नाही. कमी भाव आला असतांना कापूस घरी ठेवावा लागतो. घरी ठेवल्याने आगीची भिती, बाजारात नेला तर भावाची माती, तशा त्या 'घटना त्या व्यक्ति' मला बुचकळ्यांत टाकत आहेत. प्रिय माणसाचा मुडदा घरीं ठेवला तर कुजतो आणि जाळणेहि जमत नाही ना!

त्या घटना माझ्या मते तरी अस्सल कथाबीजें आहेत. मी कितीहि नाकारलें तरी त्या तशा आहेत. मी त्यांच्यावर लिहूं शकत नाही. त्यांचा उभार करूं शकत नाही. पण 'मनोरे' हे सदर जर त्यांना उपयुक्त असेल तर त्यांत तरी त्यांना स्थान मागणे हें माझे कर्तव्य आहे. श्री. भावे यांचे मनोरे या सदरात व्यक्त झालेले अनुभव योगायोगाच्या स्वरूपाचे आहेत. फार मोठ्या वाङ्मयकाराला जीवनाचे त्या स्वरूपाचे दर्शन घडलें आहे. अर्थात 'मनोरे' चे ते अनेकांपैकीं एक अंग आहे. मला दिसलेल्या व्यक्ती कदाचित 'मनोरे' च्या सदस्य ठरूहि शकणार नाहींत. पण मराठी नियतकालिकात अजून तरीं दुसरे स्थान न मिळाल्यामुळें त्यांचा प्रवेश येथेच मागणें प्राप्त आहे.

जी घटना दाबल्याने पुन्हां उसळते ती मझाया मराठी दुसऱ्या वर्गातली आहे. आमच्या वर्गात मोशेडांचा काशीनाथ होता. एकेकाळचे ते नांदलेले घर, पण आतां मजुरी वर निभाव करावा लागे. काशीनाथ का कुणास ठाउक पण विक्षिप्तसारखा वागे. नको तेव्हां नको त्यांच्या खोड्या काढी. गावांत तो खतपी म्हणूनच प्रसिद्ध होता. त्याला त्याचे कांहीं वाटे नाहीं. सदानकदा आपल्या पूर्व वैभवाच्या व सांगीवांगीच्या आधाराने तो वैभवाच्या थापा मारी. लोणचे ठेवण्याच्या बरणींत पूर्वीं सोन्याच्या मोहरा ठेवीत असत आणि आजहि कांहीं मोहरा आहेत अशा थापा तो मारे. सोन्यावरून या थापा असत म्हणून मुलें त्याला थट्टेने कथल्या म्हणत. ही संपत्तीची दोन टोकें एक सोने दुसरे कथील. होतां होतां कथल्या साऱ्या गांवांचाच कथल्या झाला. त्याची सावत्र आईच नव्हे तर साक्षात् बापहि त्याला कथल्या म्हणूनच हाका मारी.

हा कथल्या आमच्याकडे पुष्कळदा येई नजरेत भरण्यासारखे त्याचे येणे महत्वाचे नव्हते. माझा सोबती म्हणून तो यायचा आईला नेहमीच हातीपायी धरायला, वाणदुकानी किंवा शेजारीपाजारी धाडायला एक दोन पोरेसोरे लागत. म्हणूनहि तो अनेकदा आमच्याकडे येई. पसाभर बोरें, मूठभर लाह्या किंवा आंजुळभर शेंगा असें कांहींसे मिळे त्याच्या आशेवर. पण त्याचे एक येणे माझ्या अजून स्मरणांत आहे. तो आला तेव्हां उन्हं घडीला टेकली होती. आंगणात जांबाच्या झाडाखालीं बसून मी दूध भाकरीचा काला खात होतो. कथल्या तसा लखड लखड करायचा नाही. कौसा वहीणच्या पोरासारखी त्याची कधी पीठ लागायची नाहीं. तसा तो पुर्वीचा भरल्या घरचा. नाहीं म्हटले तरी दोन चिजा त्याच्या तोंडी लागून होत्या. पण त्या दिवशीं तो का कुणास ठावूक पण माझ्या दूधभरल्या काल्याकडे टक लावून पाहात होता. ती त्याची नजर दिटीची नव्हती. मला त्याची भिती वाटली नाहीं. येऱ्हवी मी वाटीवर घट्ट हात ठेवून ओरडलों असतों. आईला हाका मारल्या असत्या पण कथल्या आपला काला हिसकावून घेईलसे मला तेव्हां वाटले नाहीं, पण तो त्या वाटीकडे पाहात होता ती नजर विलक्षण होती. ती मला अजूनहि याहि वयांत वर्णन करून सांगता येत नाहीं. हाच मोठा खेद आहे. तो त्या वाटीकडे पाहात होता. काहीहि कारण नसताना. मी एकेक घास तोंडात लोटू पाहात होतो; जमत नव्हते. जेवणांत लक्ष नसल्याने आई कडून 'हा घास रामजी बोवाचा, हा घास सखाराम बोवाचा असे करून भरवून घेण्याचे माझे वय नव्हते. पण त्या वेळीं प्रयत्न करूनहि मला घास घेणे जमत नव्हते. घेतलेल्या प्रत्येक घासाबरोबर त्याची ती विलक्षण नजर सोबत येई. प्यावा तो तो घास त्या नजरेत डुंबून आल्यासारखें आज वाटत आहे.

मी विचारावें म्हणून त्याला विचारलें, 'तू खातोस का काला?

अगदीं किरकोळ गोष्टींत देखील केव्हां केव्हां फार मोठा आशय आढळतो. अनुभवानें तसा अगदीं साधा. परंतु तो मनावर फार मोठा परिणाम करतो. प्रतिभावंतानां त्या क्षुल्लक घटनेंत केव्हां केव्हां सुंदर कथेचीं बीजें आढळतात. अशाच **कथा बीजांची** एक लेखमाला 'मनोरे' दीपावलीतून चालू आहे. लेखकांनीं या प्रमाणें आपले कांहीं लेख दीपावलीकडे अवश्य पाठवावेत. योग्य निर्णयानंतर स्थान देण्यांत येईल.

—सं.

येऽहवी त्याने खाल्लाहि असता. आमच्या लहानपणी काला उष्टा होत नसे. एकाच वाटींत एकाने खाणे संपविण्याच्या आधी जर दुसरा जेवायला आला तर त्याला उष्टी वाटी म्हणत नाहींत. पण यावेळीं कथल्याने नकार दिला. भरपूर नकारानें भरलेली मान त्यानें पहिल्यांदा हालविली आणि नंतर तोंडाने 'नाहीं बो' म्हणून सांगितलें. मिळेल तें अधाशिपणानें गट्ट करणारा कथल्या पुष्कळदा असा संभावितीचा देखावा करी. कारण त्याशिवाय त्याच्या घरीं बरणींत सोन्याच्या मोहरा आहेत. हे आम्हांला पटणार कसें ?

कथल्यानें नकार दिला खरा; पण ती त्याची नजर तिथून दूर होईना. मी त्याला पुन्हां घे म्हणणार होतों. माझ्या चिमुकल्या मुठींत मावेल असा एक काल्याचा लोंदा घेतला व त्याला पुन्हां घे म्हणणार तोंच कथ-ल्याची चाहूल लागून त्याला आंतून आईनें हांक मारली. कथल्या झटपट घरांत गेला. पण जाता जातां काल्यावर तीच मघाची नजर रोखून म्हणाला, 'मी मामाघरीं जाईन ना तेव्हां मस्त दूध भाकर खाईन. अश्शी–' त्यानें एक भला मोठा रिकामा भुरका मारला आणि तो आंत पळाला. त्याचे मामाघरीं जाणे हीहि एक थापच होती. त्याला मामा होता. पण आई मेल्यानंतर एकदांहि इकडे उगवला नव्हता. त्याच्या बाबाचे आणि मामाचे मागे आईच्या संदुकावरून जुंपले होते. आणि मेव्हण्याच्या तेरवीलाच येण्याची प्रतिज्ञा करून मामा निघून गेला होता. तेव्हांपासून एक-मेकांच्या तेरवीची वाट पाहणें चालूं असल्या-मुळें या कथल्याच्या मघाच्या बोलण्यांत सत्य नव्हते.

जरा वेळाने कथल्या आईकडून बाहेर आला तो जिभली व बोटे चाटीत. दुधाची तावणी धुतांना काढलेली खरवड आईने त्याच्या हातावर ठेवली होती. ते धन तो लाडवून खात होता. माझ्या मनांत मात्र त्याची मघाची नजर व ते शब्द 'मामाघरीं दूधभाकर खाईन' एकसारखे घुमत होते.

जात्याची घर घर चालूं असते. मुली गाणी म्हणतात. त्या गाण्यांत मामाचा उल्लेख असतो. दळू बाई दळू। जात्याले नाहीं पाळू। मामाजी आले नेऊ॥ असे काहींसे ते गाणे. त्यांत मला कथल्या हमखास दिसतो. त्याचे ते मामा घरीं दूध भाकर खाणे दिसते. एकदां वाचण्यांत एक प्रसंग आला. एका बाल-विधवेने म्हटलें कीं, 'मला कुंकू लावायचं नसतं.' मला पुष्कळदा विचार पडतो की कथल्याची दूध भाकरीच्या काल्याला नको म्हणत असतानाची नजर व त्या निरागस पोरीची नजर एकच कां ? त्या पोरीचे व कथल्याचे वाक्य एकाच तोंडांतून निघाले असे मला उगीचच वाटून जातें. ती नजर व ते वाक्य कथेतून चितारण्याचा माझा प्रयत्न अनेकदां असफळ झाला. पण त्यांत कसल्या तरी कथेचे बीज आहे ही जाणीव मात्र मला कांहीं केल्या स्वस्थ बसूं देत नाहीं. कथल्याने हे वाक्य एखाद्या उत्तम कथा-कारा जवळ कां म्हटलें नाहीं याचा मला विषाद वाटतो.

त्याला ती नजर व ते वाक्य यांच्या-निशी एखाद्या मोठ्या लेखकासमोर उभे करण्याची आज सोय नाहीं. बरेच दिवस

त्याचा पत्ता नव्हता. सावत्र आईला कंटाळून तो घरून पळाला. परवा ऐकलें कीं तो आकोल्याला कुठे पोस्टात आहे. त्याला गाठले. छे, तो कथल्या नव्हताच. त्या कथल्याला अशी दाढी कुठे होती ? आणि आजच्या त्या पोस्टमनच्या युनिफॉर्मने त्याची ती फाटकी चड्डी ती लपवून उभे राहण्याची त्याची बाळऐट–ते सारेच पूर्णपणें झांकून गेलेलें होतें. आमची भेट झाली. पण प्रयत्न करूनहि लहानपणींचा कथल्या दिसला नाहीं. लहानपणीचे कितीतरी त्याला आठवत नाहीं. मी त्याला काल्याची आठवण मद्दामच दिली नाहीं. तो म्हणाला असता, ' छे, मी कुठे काल्याकडे पाहात होतो ?...असेनहि बुवा. पण आतां नाहीं आठवत. '

हाच सल आहे. त्यास आठवणार नाहीं. मला चितारतां येणार नाहीं. तरीहि ती अंधूक आकृति कथेचे शरीर मागत आहे.

अस्पष्टसे का होईना पण कथल्याच्या त्या नजरेत व वाक्यांत कथाबीज असल्याचे पटतें तरी. पण त्या वेळेपर्यंत मुळीहि परिचय नसलेल्या एका मुलानें तर त्याहूनहि बेचैन केलें आहे. तो मला नागपूरला राजाराम वाचनालयात भेटला. त्याचे नांव आज आठवत नाहीं. इतके सारे घडूनहि ते आठवत नाहीं. इतके आम्ही अपरिचित. आम्ही राजाराम वाचनालयांत एका वक्तृत्व स्पर्धेसाठीं जमलो होतों. अमरावतीच्या माझ्या कॉलेजनें मला त्या स्पर्धेत भाग घेण्यासाठीं पाठवून त्या वयाच्या मानानें माझ्यावर एक आंतर्राष्ट्रीय उत्तरदायीत्वच टाकले होते म्हणा ना. त्यामुळें सतत आठ दिवसांपासून सतत घोकलेले माझे भाषण त्याहि वेळी पुन्हां पुन्हां वाचण्यापलीकडे मला सवड नव्हती. म्हणूनच कोणाकडेहि लक्ष न देतां उलट लोकांचं लक्ष चुकवून मी चोरचोरून माझ्या भाषणाची पानें मनोमन वाचीत होतो. कोण कसे बोलते, कुठल्या वाक्याला त्या टाळ्या पडल्या वगैरे गोष्टी माझ्या डोळ्याकानाआड होत्या. स्पर्धाळूंचें ते अनेक भाषणांनी, हुल्लडींनी व अध्यक्षांच्या टेबलावर आदळणाऱ्या मुठींनीं भरलेलें जग मला संबंधींत नव्हते. एकदाची माझी पाळी आली. भाषण संपल्यावर शून्य मनानें भोंवतालच्या जगांत वावरण्याचा, ओळखीचे चेहरे श्रोत्या-वक्त्यांत धुंडाळण्याचा प्रयत्न करूं लागलों. नंतर स्पर्धेचा निकाल लागला. कुठल्यातरी कॉलेजला ढाल मिळाली. आम्हीहि आमचा गुदमरलेला पराभव दुसऱ्यासाठीं टाळ्या वाजवून बडवून काढला. आणि चहापानाच्या वेळी 'तो' दिसला—

आठवण चांगलीच ढवळून काढली तर त्याचें नांव धोंगे किंवा बोंडे असेंच कांहींसे होते. मोंठेहि असेल. त्याने आपणहूनच माझा परिचय करून घेतला. आपला करून दिला. तो कॉफी घेणार होता. मीहि कॉफीतलाच होतों. त्याच्या मते हे मैत्रीचे सबळ कारण ठरायला हवे होते. औपचारिक ओळखींत जे बोलायचें व जितके शिष्टाचारानें हंसायचे ते बोलून व हंसून झाले. तेवढें मलाहि जमलें. आणि मध्येच त्यानें एक आपत्तीचा प्रश्न विचारला, ' बरं तर केचे–नाहीं म्हणजे आपलं खरं सांगा हं...तुम्ही माझे भाषण कसे काय वाटले ?'

ही म्हणजे मूर्तिमंत पंचाईत होती. मी त्याचे भाषण मुळींच ऐकले नव्हते. तेथे जमलेल्या बहुधा कोणीच ते ऐकले नसेल. म्हणजे ऐकल्या न ऐकल्या इतकेंच ते ऐकले असेल. त्यांतून मी तर उघड उघड माझ्या स्वतःच्या भाषणाच्या फर्दीत चूर होतो. न ऐकून मत देणेहि अशक्य होते. वाईट म्हणायला नको चांगले म्हणण्याची सोय नाहीं कारण माझ्या व त्याच्या भाषणांना रद्दी ठरवूनच परीक्षकांनी ढाल दुसऱ्याच कुणाला दिली होती ना ? तरीहि मी मधला मार्ग काढला, ' अं– त्याचं म्हणजे, अगदींच वाईट झालं नाहीं. '

माझ्या या उत्तरावर खरं म्हणजे त्यानं चिडावं. पण प्रकार नेमका उलटा झाला. माझा एक तळवा आपल्याच हाताने पुढे घेऊन त्यावर हात मारीत तो म्हणाला, ' वाईट झालं नाहीं ना ! मग छान ' वासराला हिरवं बाटूक मिळाल्याचा भाव त्याच्या डोळ्यांत होता. आपल्याच नादात त्याने दोन तीनदा मुठी नाचवल्या. स्वतःशीच बोलल्यासारखा तो म्हणाला, ' तरी ताई म्हणतच होती कीं तुझं भाषण आज जाम होईल. '

त्यानेहि म्हटले आणि दचकल्यासारखा मी त्याच्याकडे कधीं नव्हे तो आता निरखून पाहून लागलो. कॉलेजात पहिल्या वर्षाच्या उंबरठ्यावर जणू कांहीं रस्ता चुकून आलेल्या पोरासारखा त्याचा लहानसर कोवळा चेहरा. नेहरू ठेवतात तसे एक लाल चुटुक व अजूनहि कळीतच असलेले फूल कोटावर लावलेले आणि छान व्यवस्थित पाडलेला भांग. मला तो छोकरा एकदम आवडला. त्याचे भाषण आपण ऐकायला हवे होते. असे राहून राहून वाटायला लागले त्याची ताई दिसायला लागली. त्याच्या कोटाला ती बटन लावून देत आहे, त्याचे फुगीर गाल व हनुवटी एका तळव्यात ठेवून दुसऱ्या हाताने त्याचा व्यवस्थित भांग पाडणारी, त्याला त्याच्या अजूनहि कुकुलं बाळ समजणारी, त्याला त्याच्या भाषणाबद्दल बक्षिसाची आशा दाखवणारी ताई. ती इथं आली असेल का ? पण ती इथं आली असती तर आता त्याला निश्चित भेटली असती त्याला ताईबद्दल विचारणे अर्थातच ठीक नव्हते.

पण त्यानेच आपण होऊन सांगितले, " ताईनं ऐकायला हवं होतं. " पुन्हा थांबून तो म्हणाला " तिला बरं नाही. मागल्या वर्षापासून ती निजून आहे. "

मला पुढचे ऐकणे बरे वाटले नाही. त्याच्या ताईची त्याच्या संदर्भातली जी चित्रे मी काढली होती तीं एकदम फाडली गेली. एक आजारी बाई दिसायला लागली. मी गप्पपणे कॉफी संपवली. एक दोन ओळखीचे लोक समोर होते म्हणून त्यांना टाळून बाहेर जाण्याची व सिगारेट पिण्याची घाई सुरू झाली. मी उठू लागलो. तेवढ्यांत लहानसर झटका दिल्यासारखा माझा हात हालवून तो म्हणाला,

"तुम्ही अमरावतीचे ना ? तुमच्याकडे प्रा. दाते असतील ?"

"हो, पण ते सायन्स विंगला आहेत. आमचा त्यांचा कधीं संबंध येत नाहीं."

"पण तुम्ही माझ्या करता एक तसदी घ्याना. त्यांना भेटा."

" अवश्य भेटेन काय सांगायचे त्यांना ?'

" नमस्कार सांगा बाकी कांही नाही. " आणि जराशाने पुन्हा तो म्हणाला. माझे भाषण तुम्हाला आवडले ना ? मग त्यांना तसे सांगाल काय ?"

"हो, हो, सांगेन ना. "

मग त्याचा चेहरा फुलला. ' दाते साहेब नेहमी मला हिणावतात. मग ताईचे खूप भांडण होते. पण त्यांना तुम्ही माझ्या भाषणा-

( पान २७ वर )






## ‘सहसा कधीं चांगलं म्हटलंय का यांनीं ?...’



‘छेः किती म्हणून चोखंदळ ! आणि कपड्यांच्या बाबतींत तर विचारूंच नका !’ मुंबईच्या श्रीमती आर. आर. प्रभु हे उद्गार काढून पुढें म्हणतात, ‘आतां मी यांचे सारे कपडे सनलाइटनें धुतें—आतां मात्र स्वारी एकदम खुष हो ! नी मलाहि समाधान लाभतं. सनलाइटचा फेस कसा छान गरगरीत येतो, त्यामुळें माझं काम फार सोपं झालंय ! सनलाइटनें मीं धुतें तो प्रत्येक कपडा अगदीं शुभ्र नी लख्ख होतो — अगदीं खराखुराच स्वच्छ !’

तात्पर्य, सनलाइटसारखा धुण्याचा साबण नाही, असेंच सर्व भारतभरच्या गृहिणींचे मत झाले आहे. सारे कपडे काळजीपूर्वक धुण्याच्या बाबतीत तर, तीच सनलाइटची सर दुसऱ्या कुणालाच यावयाची नाही. आपणांसहि तीच खात्री होईल.

# सनलाइट

*आपल्या कपड्यांना फारच हितकर!*

हिंदुस्तान लिव्हरचें उत्पादन






अनुक्रमणिका










होय! माझा पराभव झाला आहे. चांद्याच्या जंगलांत एका भल्यामोठ्या वाघिणीची शिकार करून मी विजयी होऊन परतलो आहे. तरीपण मला वाटतं हा विजय मिळवूनहि मी पराभूत होऊनच परतलो आहे. मी शिकार केली खरी पण वाघिणीला प्रथम जखमी करून मग ती आपल्या असह्य वेदनेनं तळमळत असताना मी तिची शिकार केली. एकाद्या क्षुद्र माणसानं करावी अशी. म्हणून म्हणतो विजय मिळूनहि माझा पराभव झाला आहे.

जंगलाचं आकर्षण मला पहिल्यापासूनच होतं. माझ्या आजोळीं उन्हाळ्याच्या सुट्टीत मी जात असे तेव्हां माझा मामेभाऊ आणि मी कित्येकवेळां आमच्या घरासमोर असलेल्या त्या डोंगरावर जाऊन तासन्तास भटकलो आहोत. सुदैवानं त्या डोंगरावर रानटी पशू नव्हते त्यामुळं आमच्या जाण्याला कुणीहि अडथळा आणला नाहीं. तरीपण पुढें कॉलेजात असताना बंदूकीचा नेम मारण्याचं शिक्षण घेऊन आणि बंदूकीचा परवाना काढून शिकारीच्या निमित्तानं जंगलेच्या जंगले तुडविलीं आहेत.

चांद्याला माझ्या नव्या जागेवर रुजू झाल्यानंतर पहिले कांहीं दिवस तिकडच्या प्रदेशाची माहिती मिळविण्यांत गेले आणि मला कळून आलं कीं चांद्यापासून आठ मैलावर असलेल्या डोंगरावरच्या जंगलभागाला बरेच दिवसात कुणी भेट दिली नाहीं. म्हणूनच तिकडे जाण्याच्या कार्यक्रमाची रुपरेखा मी आंखली.

डोंगराच्या उंच माथ्यावर स्टोअर असून एक बंगलाहि आहे. तिथून आजूबाजूचा प्रदेश फारच सुंदर दिसतो. शिवाय शिकारीसाठी भरपूर जंगली जनावरंहि आहेत अशी मला माहिती मिळाली.

माझ्या उत्साहाला पारावार राहिला नाहीं. माझ्या दौऱ्याची पत्रकें (Tour Programme) आमच्या ठिकठिकाणच्या सेक्शन ऑफिसरला पाठवून दिली आणि ऑफिसची गाडी व एक पट्टेवाला व शिकारीचा सरंजाम घेऊन मी जंगलच्या मार्गाला लागलो.

# फुलवा

*वाघिणीला प्रथम जखमी करून तीं आपल्या असह्य वेदनेनें तळमळत असतांना मी तिचीं शिकार केली. आणि म्हणूनच म्हणतों माझा पराभव झाला.*





अनुक्रमणिका

आजूबाजूच्या गोंड वगैरे आदिवासींच्या नृत्यांचा कार्यक्रमहि मला पहावयाचा होता. याखेरीज जमल्यास......

चारच्या सुमारास मी डोंगराच्या मधल्या मेटाजवळ येऊन पोचलों. मोटार रस्ता तिथंच संपत होता. तिथून चार मैल पायीच जाणं भाग होतं. त्या विभागांतले सरकारी फॉरेस्ट गार्ड मी येणार म्हणून तिथं जमले होते. त्यांनीं माझं स्वागत केलं. वरच्या डोंगरावरील स्टोअरचा रखवालदारहि तिथं आला होता. पुढं होऊन त्यानं लष्करी पद्धतीचा सलाम ठोकला.

' नांव काय तुझं ? '

' लालसिंग साब '

' अच्छा लालसिंग. इथलं चहापाणी आणि तपासणी संपली कीं निघूंच आपण जायला. '

' जी साब '

' आणखी कुणी आलं आहे का ? '

' नाही साब. वरच्या स्टोअरला मी एकटाच असतो. बीट फॉरेस्ट गार्ड इथंच जमले आहेत. त्यांचा वरच्या स्टोअरशीं संबंध येत नाहीं. '

' अच्छा. आपण दोघंच जाणार आहोंत वर. पट्टेवाला, जवळच त्याचं गांव आहे तिथं जाऊन परस्पर ऑफिसला जाईल. '

' जी साब. '

तासाभरांत सर्व कांहीं आटोपलं आणि लालसिंग व मी वर डोंगरमाथ्यावर जायला निघालों. माझं सामान न्यायला लालसिंगनं वरच्या पाड्यावर रहाणारा एक गोंड तरुण बरोबर घेतला होता.

दुसरे दिवशीं सर्वांना शिकारीसाठीं रानकाढे गोळा करून घेऊन यायला सांगितलं. त्यांनीं माना डोलावल्या. शिवाय आणखी एक बातमी दिली कीं वरच्या भागात एक वाघीण आली असून तिनं धुमाकूळ मांडला आहे. सर्वांना तिची भीति वाटते. तिची शिकार करणं आवश्यक आहे. चांदाच्या घनदाट जंगलाचा पुन्हा एकवार प्रत्यय आला. गगनाला भिडणारी उंचच्या उंच सागाची झाडं सूर्याचे किरण जमिनीवर येऊं देत नव्हती. मध्येंच कुठंतरी वस्ती असायची. चार-पांच झोंपड्या इथं, दोनचार तिथं असं पसरलेलं गांव, पण तें स्वच्छ वाटायचं. आणि आम्ही चाललों कीं म्हाताऱ्यापासून पोरापर्यंत बायका, पुरुष, पोरं सारेजण कुतुहलानं पहात रहायचे. लालसिंग मग कुणाला कांहीं विचारायचा.

' तुम्ही बरीच ओळख दिसते लालसिंग ' मी विचारलं.

' त्रास आणला या लोकानीं साब. सरकारी जंगलातलं एक झाड कांहीं नीट वाढून देत नाहींत हे लोक. '

' चालतं कसं या लोकांचं या जंगलांत ? '

' जाणार कुठं हे लोक साहेब ? बापजाद्यापासून इथं रहात आले आहेत. उपाशी मरतील पण वस्ती सोडून जाणार नाहीत. सरकारनं यांच्यासाठीं किती सोई केल्या आहेत. ठिकठिकाणी शाळा काढल्या आहेत पण त्या मोकळ्या पडल्या आहेत. हें लोक जात नाहीत तिकडं. '

' मग खातात काय ? '

पिकवतात कांहींतरी थोडसं धान्य. लाकूड फाटी चोरून गोळा करायची आणि विकायची. ससे, हरणं, डुकर आहेतच. शिवाय दारूच्या चोरट्या भट्ट्या...

**माधव लावंडीकर**

' लालसिंग मलाहि लज्जत घ्यायची आहे मोहाच्या दारूची आज. ' लालसिंगची जिवणी रुंद झाली. तो कांहीं बोलला नाहीं. सरकारी अधिकाऱ्यांच्या सरबराईत आयुष्य घालविलेल्या त्या बुढ्याला आम्ही लोक कसे वागतो हें काय माहिती नसणार ?

सूर्यास्ताच्या सुमारास आम्ही डोंगर माथ्यावर पोचलों. आजूबाजूला दृष्टी टाकली आणि खरोखर इतक्या उंचीवर इतका त्रास घेऊन आल्याचं सार्थक झालं. सूर्यास्ताच्या संधीप्रकाशांत तांबूस छटेंत दिसणारं तें आकाश आणि भोंवतालचं जंगल पाहिल्याबरोबर मनाला जो कांहीं आनन्द वाटला तो शब्दानं सांगणं कठीण आहे. कितीतरी वेळ तें दृश्य पहात मी उभा होतों. हळूं हळूं अंधार पडूं लागला. तरी मला हलण्याचे भान राहिलं नाहीं.

' साब ' लालसिंगनं हांक मारली.

मी भानावर आलो. डोंगर माथ्यावरचा गारठा अंगाला झोंबू लागला. मी बंगल्यात परतलो.

डोंगर माथ्यावरचा हा बंगला मोठा सुरेख आणि प्रशस्त होता. इंग्लिश अमदानीत मोठमोठे युरोपियन अधिकारी या ठिकाणीं शिकारीला आणि मजा मारण्यास येत असत. त्यांच्यासाठीं सर्व सुखसोईंनी पूर्ण असा हा बंगला बांधला होता. तिथून खालीं थोड्या अंतरावर असलेल्या विहिरीचं पाणी पंप लावून बंगल्यांत खेळविलं होतं.

लालसिंगानं कंदील घेऊन सर्व बंगला मला दाखविला. प्रशस्त हॉल, मोठमोठे व्हरांडे, जेवणाच्या खोल्या, सुंदर फर्निचर. साहेब-लोक मोठे हौशी होते यांत शंका नाहीं.

बंगला पाहून आल्यानंतर मी माझ्या खोलीत परतलो. अंगावरचा साहेबी पोशाख उतरून साधे कपडे पेहेरले. आणि बाथरूममध्यें जाऊन हातपाय तोंड धुवून आलों तोंच लालसिंगनें चहाचा कप माझ्या टेबलावर आणून ठेवला. त्या गरम चहाचे घुटके घेत असतां मी विचारलं—

' लालसिंग जेवणाची काय व्यवस्था आहे ? '

' फुलवा आली आहे साब, जेवण तयार होत आहे '

' फुलवा ? ' मी म्हटले. फुलवा हें नांव मला मोठें गोड वाटले.

' होय साब. जेवण फार सुरेख तयार करते. '

' अच्छा. आणि लालसिंग नाच पहायचा होता मला या जंगलातल्या लोकांचा '

' आज रात्रभर विश्रांती घ्या साब. उद्यां नाचाचं पाहूं. '

' ठीक आहे. '

मी विश्रांतीसाठीं कॉटवर पडलो. लालसिंगनें टेबलावर दिवा आणून ठेवला आणि तो निघून गेला.

बऱ्याच वेळानंतर लालसिंग मला जेवणासाठीं बोलवायला आला. मी उठलो. चूळ भरून शेजारच्या एका खोलीत गेलो. टेबल उत्कृष्ट रितीनं सजवलं होतं. उदकाड्यांचा मंद सुवास सर्वत्र पसरला होता. मी खुर्चीवर बसलो आणि थोड्याच वेळांत जेवणाचं ताट घेऊन फुलवा आली. तिला पहातांच मी चकीत झालो. मघाशी फुलवा हें नांव मला मोठं गोड वाटलं होतं पण आतां फुलवाला प्रत्यक्ष

अनुक्रमणिका









# व्यापारी रक्त

देशोदेशींच्या लोककथा

( इंग्रजी लोककथा )

एकदां एका शार्क माशानें समुद्रांतून भरवेगानें चाललेल्या एका जहाजाचा पाठलाग सुरू केला. कप्तानानें पाठलाग चुकविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला पण काहीं जमेना. शार्क मासा जहाजावर येऊन सर्व जहाजाचा फडशा करील त्यापेक्षां त्याला काहीतरी खाद्य द्यावं म्हणून त्या चतुर कप्तानानें एक खुर्ची त्या माशाच्या अनुरोधानें फेकली. शार्क माशानें ती खुर्ची हीं हां म्हणतां गिळंकृत केली व तो परत जहाजाच्या रोखानें निघाला तेव्हां कप्तानानें संत्र्यांची एक करंडी फेकली. तिचाहि स्वाहा करून तो शार्क मासा जिभल्या चाटीत परत जहाजामागून येऊं लागला. आतां काय करावं ! कप्तानानें डोकं खाजव खाजव खाजवलं व ठरविलं कीं एखाद्या माणसाचा बळी घेतल्याशिवाय काहीं हा शार्क आपली पाठ सोडणार नाहीं. पण बळी द्यायचा कुणाचा ! शेवटी सर्वानुमतें त्यानें चिठ्या टाकल्या व ज्याचें नांव येईल त्याचा बळी द्यावयाचा असें ठरलें. आणि त्याप्रमाणें चिठ्ठींत एका ज्यू माणसाचें नांव निघालें. तेव्हां सर्वांनीं मोठ्या दुःखित अंतःकरणाने त्या ज्यूला शार्क माशाच्या दिशेनें फेकला. क्षणार्धात त्या ज्यूला आपल्या पोटांत रिचवून तो शार्क काहीं मिनिटाच्या आंतच त्या जहाजाच्या रोखानें परत निघाला. आतां मात्र कप्तान चिडला. या शार्क माशाची भूक आहे तरी केवढी ! कप्तानानें व त्याच्या हाताखालील माणसानी जिवाच्या आकांतानें त्या शार्क माशावर हल्ला केला. बरच्या मारल्या आणि पुष्कळ वेळानें तो शार्क मासा मरण पावला.

कप्तानाला व त्याच्या माणसांना हायसं वाटलं. त्यांनी मोठ्या प्रयासाने तो प्रचंड शार्क मासा जहाजावर आणला. त्याचं पोट फाडलं आणि आंत पहातात तों, त्या माशाच्या पोटांत पुष्कळशीं माणसं असून मध्यभागीं एका खुर्चीवर तो ज्यू बसला आहे. त्याच्या पुढ्यांत संत्र्यांची करंडी आहे व ती संत्रीं तो त्या माणसानां १ शिलिंगाला १ या भावानें विकत आहे, असें आढळलें. ●●●

*( दीपावलीचें हे एक नवें सदर आहे. या सदरांतून विश्वसाहित्यांतील उत्तमोत्तम निवडक लोककथा अधुनमधून देण्यांत येतील. लेखकांनी अशा तऱ्हेच्या जागतिक वाङ्मयांतील लोककथा पाठविल्यास दीपावलीतून त्याचा योग्य परामर्श घेतला जाईल. )*

पाहिल्यानंतर त्या नांवाची गोडी अधिकच वाटूं लागली. सौंदर्याचे पुष्कळ प्रकार मी पाहिले आहेत. अगदीं खेडेगांवातील राकट सौंदर्यापासून शहरांतल्या तकलादू सौंदर्यापर्यंत. पण फुलवाचं सौंदर्य कांहीं आगळंच होतं. मी जेवायला सुरवात केली. लालसिंग मधून मधून काय हवं नको तें विचारून जात होता. आणि मीहि त्याला सुचेल तें आणायला सांगत होतो. आणि फुलवा तो पदार्थ घेऊन वाढून जात होती. स्वयंपाक चागला झाला होता म्हणा किंवा फुलवाच्या सौंदर्याची मोहिनी माझ्यावर पडली होती म्हणा त्या उत्साहाच्या भरात मी सपाटून जेवलो. हात धुवून मी परत माझ्या खोलीत आलो. लालसिंग मागं होताच.

'लालसिंग ही फुलवा कोण आहे रे ?'

'कामाला असते इथं साब. खालच्या पाड्यावर घर आहे तिचं.'

'लालसिंग'

'जी साब'

'तिला सांग आज घरीं जाऊ नकोस म्हणून.'

'साब, ती तयार होइल असं वाटत नाही.'

'लालसिंग तुझ्या सारख्यानं असं बोलावं ? आश्चर्य आहे !'

'पहातो विचारून साब'

'अस्सं'

लालसिंग गेला. दिवसभराच्या श्रमानं आणि भरपूर जेवणामुळं मला झोप येऊ लागली होती. थोड्यावेळानं फुलवा आली. खालच्या मानेनं तिनं म्हटलं 'जाते मी बाबूजी' माझी झोप एकदम उडाली. मी म्हटलं 'निघालीस फुलवा ? लालसिंगनं तुला काहीं सांगितलं नाही ?'

'नाही बाबूजी. तो म्हणाला साहेबाना विचारून जा'

'फक्त इतकंच ?'

'हो'

'फुलवा आजची रात्र तुला इथं रहायला हवं.'

'छेः छेः बाबूजी. मला रहाता येणार नाहीं.'

'कां नाहीं येणार ? राहिलं पाहिजेस. आज तूं—'

'काय बोलतां हें बाबूजी' अंगावर शहारे आल्यासारखी थरारून ती म्हणाली.







अनुक्रमणिका

'होय फुलवा, तुला राहलं पाहिजे.'

'शक्य नाहीं तें बाबूजी.'

'कां शक्य नाहीं? लालसिंग तुझा निरोप घेऊन तुझ्या घरीं जाईल. आणि भरपूर पैसेहि.'

'बाबूजी, तुम्हांला कळायला हवं मी त्यांतली नाहीं. मला नवरा आहे.'

मला मोठ्यानं हसू आलं मी म्हटलं.

'फुलवा त्या नवऱ्याचं तोंड कसं बंद करायचं तें मला माहिती आहे. किती पैसे मागेल तुझा नवरा?'

'बाबूजी, मी चालले,' असं म्हणून धाडकन् दार आपटून फुलवा चालायला लागली. मी कॉटवरून उठून तिच्या मागं धावलों. त्याबरोबर मागं फिरून ती म्हणाली, 'खबरदार बाबूजी माझ्या अंगाला हात लावाल तर. या इथं, जीभ हासडून प्राण देईन तुमच्या पायाशीं.'

मी क्षणभर थांबलों आणि नंतर पुढं होऊन मी हांक मारली 'लालसिंग'

'आलों साब' लालसिंग धावत आला तसा ओरडून मी त्याला म्हणालों 'लालसिंग, आत्ताच्या आत्तां हिचे काय पैसे झाले असतील तें फेकून दे तिच्या अंगावर आणि हाकलून लाव तिला. पुन्हा या बंगल्यांच्या कंपाउंडमध्यें ही दिसली तर फोडून काढीन तुला समजलं?'

लालसिंगनं ओळखलं साहेबांना हवं ते द्यायला फुलवा तयार नाहीं म्हणून साहेब संतापले आहेत. तो तत्परतेनं म्हणाला, 'कांहीं एक देणं नाहीं साहेब हिचं. कालच हिचा पगार चुकता केला आहे.'

'मग हाकलून लाव. पतिव्रतेचा आव आणते—' पण ते शब्द ऐकायला फुलवा तिथं नव्हती. ती दाराच्या बाहेर निघून गेली होती. दरवाजा लावून घेत लालसिंग म्हणाला, 'जाऊं द्या साब. उद्यां पलटण उभी करतो बायकांची. तिलाच काय असं सोनं लागलंय. नाहीं तरी ती थोडी आगाऊच आहे.'

'कोण आहे रे तिच्या घरीं?'

'कुणी नाहीं साब. दोन मुलं आणि नवरा. तोहि पांगळा झालाय. गेल्या वर्षी जंगल तोडीच्या वेळीं झाड पडलं त्याच्या अंगावर. हीच पोसते त्याला.'

हवं ते न मिळाल्यामुळं माझ्या अंगाचा नुसता संताप झाला होता. तो नाहींसा व्हायला एकच औषध होतं. मोहाची दारु! मी लालसिंगला म्हटलं, 'लालसिंग, तुझी ती बाटली घेऊन ये. आतांच्या आतां.' आणि मी कॉटवर जाऊन पडलों. लालसिंग काळी कुळकुळीत बाटली टेबलावर ठेऊन निघून गेला. कॉटवरून उठून मी बाटलीतलं मद्य कपांत ओतून घेतलं आणि त्याचे दोन घोट घेतले. उग्र दर्पाचं तें जळजळीत मद्य घशा भाजीत गेलं. मी पुन्हा कॉटवर जाऊन पडलो. परंतु थोड्याच वेळांत लालसिंगनं हांक मारली.

'साब'

'काय आहे लालसिंग?'

'फुलवा पुन्हा माघारी आली आहे.'

'लालसिंग, काय तिचे पैसे राहिले असतील ते फेकून दे तिच्या अंगावर आणि हाकलून लाव खालीला.'

'नाहीं साब, आपली सेवा करीन म्हणते ती आज'

माझ्या कानावर ते शब्द पडतांच मी ताडकन् उठलो. फुलवा परत कां आली असेल, तिच्या मनांत काय बदल झाला असेल याचा उलगडा करून घेण्याच्या मनःस्थितींत मी नव्हतों. फुलवा पुन्हां आपणहून परत आली आहे या शब्दांनीच माझा सारा विवेक कुठच्या कुठं पळाला होता.

'पाठवून दे तिला आंत' मी म्हणालो. फुलवा आंत आली 'फुलवा तूं असं करायला नको होतंस.'

'माफी करा बाबूजी' खालीं मान घालून ती म्हणाली.

'फुलवा तं बाटलीतलं वासाचं तेल लाव केसांना. तिथं साबण आहे. झकासपैकीं तोंड धुवून ये.'

एखाद्या आज्ञाधारक मुलाप्रमाणं मी सांगेन तें, एक शब्दही न बोलतां फुलवानं ऐकलं आणि आपला देह माझ्या स्वाधीन केला.

दुसरे दिवशीं मला जरा उशीराच जाग आली. लालसिंग मला बोलवायला आला. आदल्या दिवशीं मुद्दाम बोलावलेले पांचपंचवीस रानकाढे शिकारीच्या तयारीनं आले होते. मी प्रातर्विधी आटोपून चहा घेतला. सुखासीनतेनं माझं शरीर मोहोरलं होतं. फुलवा केव्हां निघून गेली हेंहि मला कळलं नाहीं. लालसिंगला जरूर त्या सूचना देऊन जामानिमा करून शिकारीसाठीं मी बाहेर पडलो. खालच्या पाड्यावर आल्यानंतर मला तिथल्या लोकांनीं सांगितलं 'त्या समोरच्या जाळीत काल रात्रीं वाघिणीचे डोळे चमकत होते.' भीतीनं कुणाला रात्रभर झोप लागली नव्हती. त्यामुळं मी शिकारीला आलो हे पहातांच त्यांना आनंद झाला. हातांत रिकामे डबे, पलिते घेऊन रान काढायला सारा पाडा एकत्र झाला होता. सर्वांना नीट सूचना देऊन मी एका उंच कातळावर बंदूक सरसावून उभा राहिलों. रिकाम्या डब्याच्या आवाजानं सारं रान भरून गेलं, आणि थोड्याच वेळांत एका गाडीनं येऊन सांगितलं 'साहेब, वाघिण आंतच आहे. आम्हांला दिसली.' मी पुन्हां सूचना दिली पुन्हां जोरांत आवाज होऊं लागला. आणि त्या आवाजानं त्रासलेली क्रूद्ध वाघिण जाळींतून बाहेर पडली. त्याबरोबर सर्वांनीं गिल्ला केला, 'आरं आली रं आली.'

चवताळून बाहेर पडलेली वाघिण कोंडाळ्यांतून बाहेर पडायला मार्ग पाहूं लागली. तिची ती चवताळलेली मुद्रा पाहून मलासुद्धां थोडं भय वाटलं. मी सरसावून उभा राहिलो आणि दृष्टीच्या टप्प्यांत ती येतांच नेम धरून गोळी झाडली. पण काय झालं हें समजावयाच्या आंतच कातळावरून माझा पाय घसरला आणि मी खालीं पडलो.

वाघिण कां फुलवा? नक्की बोध होत नव्हता. एकदां वाटत होतं 'फुलवाच असेल' मी केलेली मागणी झिडकारून माझ्या अंगावर वाघिणीसारखी धावून येत आहे. 'खबरदार बाबूजी, माझ्या अंगाला हात लावाल तर' पुन्हां वाटे छेः फुलवा नव्हे ही वाघिणच. मघाशी टाकलेली गोळी चुकवून माझ्या नरडीचा घोट घेण्यासाठीं टिप्पण साधून उडी घेत आहे. मदतीसाठीं कुणाला तरी हाक मारायची होती. पण माझ्या तोंडून शब्द फुटत नव्हता

'ल-ल-लालसिंग' जोर करून मी ओरडलों आणि डोळे उघडले. मी कुठं आहे हेंच कळेना. सगळेजण माझ्या भोवतीं जमले होते.






मी डोळे उघडतांच सगळ्यांना बरं वाटलं.

'आले. साहेब भानावर आले.' सगळे ओरडले.

'साहेब, केवढ्या संकटांत टाकलं होतं आज आम्हांला' लालसिंग पुढं होऊन म्हणाला.

'लालसिंग, कुठं आहे मीं ? आणि वाघिण...?'

'जाऊं द्या साहेब ती वाघिण. तुम्हीं बरे व्हा अगोदर.'

'म्हणजे ? काय झालंय मला ?' मी हात उचलायचा प्रयत्न केला.

'वाः साहेब, पाय घसरून पडला अंग ठेचाळलंय. आणि काय झालंय म्हणताय.'

आणि खरंच. माझं अंग ठणकत होतं. वाघिणीवर गोळी टाकली. तिला ती निसटती लागली होती. दुसरा एक शॉट टाकायला पाहिजे होता. पण गडबडींत माझा पाय कातळावरून घसरला आणि मी आडवा होऊन खालीं घसरत गेलों. त्यांतच माझी शुद्ध हरपली होती. रानकाटे आपली जागा सोडून माझ्याकडे धावले आणि याचा फायदा घेऊन जखमी वाघिण आपल्या वेदनानी तळमळत झाडीत अदृश्य झाली.

बेशुद्धावस्थेंत साऱ्यांनीं मला उचलून तिथून जवळच असलेल्या फुलवाच्या झोंपडींत आणलं. लालसिंगला निरोप पाठवला. जवळपास डॉक्टर मिळणं शक्य नव्हतं. शिवाय मला जखमाहि विशेष झाल्या नव्हत्या. फक्त दगडाधोंड्यांनीं माझं अंग ठेचाळलं होत. फुलवाच्या झोंपडींत मला शुद्धीवर आणण्याचे उपाय सुरू होते. लालसिंग तर विशेष काळजींत होता. मी त्याला हांक मारल्याबरोबर त्याला आनंद झाला. 'चला निघारे बाहेर. पडूं द्या साहेबाना आता.' लालसिंगानं सर्वांना उठवून लावलं.

'लालसिंग' मी म्हटलं 'आपल्याला बंगल्यावर जायचंय. कुणाला तरी हाक मार. त्याच्या मदतीनं वर जाऊ आपण.'

पण माझं बोलणं संपत आहे तोंच कुडाच्या मागून फुलवा पुढं आली.

'नाही बाबूजी. जखमी होऊन आलेल्या मेहमानाला तसंच घरी पाठवायची रीत नाही आमच्यांत. तुम्ही बरं होऊनच इथून गेलं पाहिजे.'

मला आश्चर्य वाटलं. 'खबरदार बाबूजी, माझ्या अंगाला हात लावाल तर जीभ हासडून प्राण देईन इथं तुमच्या पायाशी' असं त्वेषानं म्हणणारी कालची फुलवा हीच कां असा मला संभ्रम पडला. पण इतक्यांत एक नवीनच कल्पना माझ्या डोक्यांत चमकून गेली. 'कालच्या कृत्याबद्दल सूड तर घ्यायचा नसेलना हिच्या मनांत, मला इथं अशा परिस्थितीत पाहून ?' पण माझ्या मनाचा थांगपत्ता तिला लागला कीं काय कोण जाणे.

'घाबरलांत बाबूजी मला, कांहीं वेडंवाकडं करीन म्हणून ?' हंसून ती म्हणाली आणि उभ्या असलेल्या लालसिंगाला तिनं सांगितलं 'लालसिंग, बाबूजींचा बाडबिस्तारा इथंच घेऊन ये. बाबूजी राहातील माझ्या झोपडींत बरं वाटेस्तवर'

काय करावं असा मला विचार पडला. मला वाटलं लालसिंग तरी यावर कांहीं बोलेल. पण त्यानं तात्काळ मान हालविली.

शिकारीसाठी जमा झालेले गार्ड आंत आले. त्यांना ड्यूटीवर हजर व्हायचं होतं. साहेब आता भानावर आले आहेत. फार मोठां अपायहि त्यांच्या जिवाला झाला नव्हता. आता जायला हरकत नाहीं. शिवाय माझ्या दिमतीला लालसिंग होताच. मी त्यांना जायला परवानगी दिली.

फुलवाच्या प्रेमळ सुश्रुषेनं मी दोन तीन दिवसांतच बरा झालों. दुपारची वेळ होती. फुलवा माझ्या घरची माहिती विचारीत होती. फुलवाचं मन जाणून घ्यायला ही वेळ बरी आहे असं वाटून हलक्या आवाजांत मी म्हटलं, 'फुलवा, खरं सांग परवा तूं पुन्हां कां परत आलीस ?'

फुलवा खालीं मान घालून बसली. तिच्या डोळ्यांतून टपटप आसवं पडूं लागली.

'राहूं देत फुलवा. नको सांगूस. माझं चुकलंच'

'बाबूजी रागानं मी दाराच्या बाहेर पडले. तुमचं बोलणं ऐकलं' पुन्हां या बंगल्यांत ही दिसली तर फोडून काढीन तुला' बाबूजी, लालसिंगानं मला बंगल्यांत येऊन दिलं नसतच पण या पाड्यावर राहूं दिलं नसतं. माझा पांगळा नवरा, दोन लहान मुलं, माझ्या नजरेसमोर उभी राहिली. म्हणून मी परत आले बाबूजी. तुम्हांला झोप लागली. मी उठून बाहेर आले. लालसिंग माझ्याकडं बघून हंसत होता. मला चीड आली. आणि त्या चिढीच्या भरांत मी जीव द्यायला तळ्यावर गेले. पण नवऱ्यासाठीं, लहान पोरांसाठीं पुन्हां निम्या पाण्यांतून वर आले. बाबूजी मला मरून भागणार नाहीं. ज्यानं माझ्या संसाराचं, घरादाराचं वाटोळं केलं, माझ्या नवऱ्यांला पांगळं करून आयुष्यांतून उठवलं त्या लालसिंगाचा सूड घेतील माझी मुलं मोठी झाल्यावर. त्यांना जगवलं पाहिजे मला.'

'लालसिंगाचा काय संबंध ? माझ्यासाठीं त्यानं तुला...'

'नाहीं बाबूजी, माझा नवरा पांगळा झाला त्याला हा लालसिंग कारण आहे. त्यानं बुध्याच झाड पाडायला लावलं माझ्या नवऱ्याच्या अंगावर'

'त्याचा काय हेतु...?'

'लालसिंगची बायको चार वर्षांमागं मेली. 'फुलवाचं माझ्याशीं लगीन करून द्या' असा लकडा लावला होता माझ्या बापाच्या मागं त्यानं. पण सहा पोरं पदरांत असलेल्या आणि निम्मी लाकडं मसणवटींत गेलेल्या त्या बुढ्याला नाहीं म्हटलं बाबूजी माझ्या बापानं. आणि झटपट लगीन करून दिलं माझं.

'आम्ही दोघं फार सुखी होतो बाबूजी. कुऱ्हाडीच्या एका फटक्यांत रानडुक्कर पाडायचा माझा नवरा. गेले वरीसभर पांगळा होऊन पडलाय पण हाडपेर बघा त्याचं बाबूजी, पण तुम्ही पुरुषाचं हाडपेर कशाला बघाल, तुम्ही पहाल बायांची तोंडं.' फुलवानं माझ्यावर जाता जाता प्रहार केला.

'जंगलतोड चालू होती. लालसिंगानं मजुरांना फितवून बुध्याच झाड पाडवलं त्याच्या अंगावर. तो मेला म्हणजे तरी मी घाट लावीन त्याच्याबरोबर असं वाटलं लालसिंगला. पण बाबूजी माझा नवरा मेला नाहीं, तगडा होता म्हणूनच वांचला.'







अनुक्रमणिका

' तूं तक्रार नाहीं केलीस त्याबद्दल ? '

' केली बाबूजी, पण कोण दाद घेणार गरीबाची. तीनशे रुपये नुकसानी मंजूर झाली पण तिथंहि हा लालसिंग आडवा आला. माझा नवरा त्या दिवशीं सरकारी कामावर नव्हता असं सांगितलं त्यानं.'

' पण इतर लोकांनीं...'

' लालसिंगाच्या विरुद्ध जायला भितात या पाड्यावरचे लोक बाबूजी. जंगलांत दारूच्या भट्ट्या लावतो आणि आमच्या लोकांना पकडून देतो, खाजगी मालकीतली लाकडं तोडली तरी सरकारी जंगलांतली लाकडं तोडली म्हणून दंड करतो. '

फुलवा चिडून बोलत होती. तिच्या डोळ्यांतून अंगार पडत होते. आमच्यासारख्या सरकारी अधिकाऱ्यांच्या पुढं वाकून, त्यांना हवं तें पुरवून त्याच्या बळावर हा साळसूद दिसणारा लालसिंग गरीबांना छळत होता.

' फुलवा तूं कांहीं काळजी करूं नकोस. तुझ्या नवऱ्याचं नुकसान भरपाईचं प्रकरण दडपलं गेलं असलं, जुनं झालं असलं तरी मी तें पुन्हा शोधून काढून तुला पैसे मिळण्याची व्यवस्था करतो. '

' नको बाबूजी, हा पाडा सोडून जायचं ठरवलं आहे मी. त्याच दिवशीं जाणार होते पण जखमी होऊन आलात बाबूजी म्हणून राहिले.'

' पाडा सोडून जायचं कारण नाहीं फुलवा. लालसिंग पुन्हां तुझ्या वाटेला जाणार नाहीं याचा बंदोबस्त करून जाईन मी. '

' नाहीं बाबूजी, तुम्ही असेतोवर त्रास देणार नाहीं तो मला पण तुम्हीं काय कायम रहाणार आहांत थोडेच. या पुढं बंगल्यांत येणाऱ्या प्रत्येकासाठीं आणि आपल्यासाठीं तो मला बोलावून घेईल. कोणत्या तोंडानं नाहीं म्हणूं मी त्याला बाबूजी ? परवापर्यंत नाहीं म्हणायला बळ होतं मला पण बाबूजी त्या रात्रींच तें बळ मोडून पडलं माझं '

उठून चालू लागण्याइतपत ताकद मला आली आणि मी बंगल्यावर परत आलो. दुसऱ्याच दिवशीं खालच्या पाड्यावरून निरोप आला. ' जखमी वाघिण रात्रभर ओरडत होती. ' मलाही वाटलं अशी जखमी वाघिण तशीच मोकळी राहू. देणं धोक्याचं आहे. म्हणून रानकाढे जमा करायला सांगून लालसिंग ' नको नको ' म्हणत असताहि मी बंदूक घेऊन बाहेर पडलों. मला फार वेळ थांबावं लागलं नाही. जवळच्या झाडीतच जखमी वाघीण असह्य वेदनांनीं तळमळत कण्हत पडली होती. एका गोळीतच मी तिला होणाऱ्या यमयातनेतून सोडवलं. केलेली शिकार बंगल्यावर आणायला सांगून मी बंगल्यावर परतलों आणि परत निघण्याची तयारी करायला सांगितलें तोंच मला फुलवाची आठवण झाली.

तिला बोलावून आणायला लालसिंगाला पिटाळलं. पण तो सांगत आला फुलवाची झोपडी रिकामी आहे. झोपडींत सामानसुमानसुद्धां नाहीं. फुलवा म्हटल्याप्रमाणें पाडा सोडून गेल्याचं माझ्या लक्षांत आलं.

' शेजारी चौकशी नाहीं का केलीस तूं ? '

' केली साब, पण कुणालाच कांहीं पत्ता नाहीं. '

तिच्यासाठीं मी कांहीं करायचं ठरवलं होतं पण तो उपकार सुद्धां तिनं घेतला नाहीं. विमनस्क मनःस्थितींत मी चांद्याला परतलों.

म्हणूनच म्हणतो माझा पराभव झाला आहे. चांद्याच्या जंगलांत एका भल्या मोठ्या वाघिणीची शिकार करून मी विजयी होऊन परतलों आहे पण मला वाटतं हा विजय मिळवूनहि मी पराभूत होऊन परतलों आहे. मी शिकार केली खरी पण वाघिणीला प्रथम जखमी करून ती आपल्या असह्य वेदनेनं तळमळत असतांना मी तिची शिकार केली. एखाद्या क्षुद्र माणसानं करावी तशी— * *

---

(पान २० वरून)

बद्दल सांगाच. त्यांना आनंद होईल. मी असं कांहीं केले म्हणजे त्यांना कौतुक वाटते.

मी होकार देताच अधिक परिचय वाढवण्याऐवजीं तो निघून गेला. जातांना मात्र एकदा वळला आणि हात हालविला. त्याला तेच सुचवायचे होते–' दात्यांना सांगा. '

तो गेला तेव्हांपासून आतापर्यंत मला एक हुरहूर लागली आहे. त्याची आठवण होते. आपण त्याचा पत्ता, निदान त्याचे कॉलेज विचारून घ्यायला हवे होते. प्रा. दाते यांचाहि पत्ता हुडकण्याची मला आठवण राहिली नाहीं. जेव्हां आठवण आली तेव्हां प्रा. दाते नांवाच्या गृहस्थांनी आमचे कॉलेज सोडले होते. राजाराम वाचनालयाच्या त्या गर्दीत भेटलेला तो छोकरा त्याहून मोठ्या गर्दीत मिसळून गेला. जाताना आपले एकदा सहज म्हणून सांगितलेले नांवहि घेऊन गेला. त्याचा तो कोवळा चेहरा व ताईचे चित्र हे मात्र कथेत केव्हाची जागा मागतात.

कथा लेखनाचा एक काळ असा आला की कथेच्या शेवटीं वाचकांचीं उत्सुकता तशीच राहूं देत. ' त्यांनी जसे राज्य केले तसेच तुम्हीहि करा. ' असा सुटसुटीत आशीर्वादात्मक व निश्चित शेवट जुन्या कथांना असे. त्याला सोकावलेले वाचकमन त्या उत्सुकता कायम ठेवणाऱ्या कथांवर चिडतात. मीहि त्या पोराची व त्याच्या ताईची आठवण झाली की असाच चिडतो. तो पोरगा आता कोठें असेल ? त्याची ताई दुरुस्त झाली असेल काय ? माझी उत्सुकता अशी हजारो प्रश्नांनी मला बोचकारते.

हेच नाहीं असे किती तरी प्रसंग व चेहरे आपापली कथाबीजे घेऊन मला भेटले. एका अपंगाच्या झोळींत नियतीने हे दान टाकले. झोळी माझी मलाच उचलत नाहीं. ● ● ●

**पहिला धक्का**

"आपल्या फोटोच्या आणखी २ प्रती पाहिजेत, त्याशिवाय आपल्याला व्हिसा देतां येणार नाही" सिलोन एम्बॅसीमधील शामवर्णीय सुंदरीनें मला आपल्या किनऱ्या आवाजांत सांगितले आणि क्षणार्धात माझा चेहरा अक्षरशः फोटो काढण्यासारखा करून टाकला. मी पासपोर्टसाठीं फोटो काढल्याला १ महिना होऊन गेला होता, त्याची निगेटीव्ह फोटोग्राफर जवळून शोधून काढून त्याच्या प्रती मिळविणें म्हणजे एक दिव्यच होतें. शेवटीं एकदांचे कसेबसे फोटो मिळविले. 'इन्कमटॅक्स' आदी भानगडी माझ्या संबंधांत येत नसल्यामुळें मला विशेष त्रास पडला नाहीं. तेथील अधिकाऱ्यांनी आमच्या चेहऱ्याकडे बघूनच 'इन्कमटॅक्स क्लीअरन्स सर्टीफीकीट' तावडतोब दिलें असावें. त्यानंतरचा कार्यक्रम म्हणजे टोंचून घेणे. अजूनपर्यंत टोंचून टोंचून बोललेलें ऐकून घेण्याची संवय होती, परंतु येथें बोलतां बोलतां प्रत्यक्ष टोंचण्याचाहि कार्यक्रम झाला. एकंदरीत 'पासपोर्ट' 'इंटर नॅशनल हेल्थ सर्टीफीकेट' 'इन्कमटॅक्स क्लीअरन्स सर्टीफीकेट' 'व्हिसा' इत्यादि शब्द उच्चारतानां जरा बरें वाटतें, परंतु ती मिळवितांना मात्र नाकीं नऊ येतात.

**पुन्हां एकदां मंडपांत**

चांगल्या कार्याला मंडपांची आवश्यकता लागतेच कीं काय न कळे. जिथे सर्व कागदपत्र तपासून शिक्के मारले जातात त्या ह्या दक्षिण रेल्वेच्या स्टेशनचे नांव आहे 'मंडपम्.' हे स्टेशन धनुष्कोडी पासून ७/८ मैल अलीकडे आहे. येथे सर्व 'टाकटीक' करून गेलें नाहीं, तर धनुष्कोडी पासून परत यावे लागते आणि त्यासाठीं एक दिवस मोडावा लागतो. शेवटीं बराच वेळ मोडल्यानंतर एकदांचा ह्या मांडवाखालून बाहेर पडून धनुष्कोडीच्या मार्गाला लागलो. येथून पुढे धनुष्कोडी, रामेश्वर व मंडम् ही ठिकाणें जोडणारा १॥ मैल लांबीचा समुद्रांत बांधलेला पूल लागतो. मोठाल्या बोटी जावयाच्या असल्या म्हणजे दुभंगून वाट करून देणारा हाच तो पूल.





# चला सिलोनला

*कोलंबो ते कँडी या निसर्गसुंदर रस्त्यावर तुम्हाला सिलोनचं सौंदर्य तर दिसतंच पण ह्याच मार्गावर प्रसिद्ध 'कॅजू गर्ल्स' भेटतात.*

**—श्री. माधव जोशी**
यांनी अनुभवलेला सुखद प्रवास

**धनुष्कोडी**

दक्षिण रेल्वेचे हे शेवटचें ठिकाण. गाडी आणि बोट येथेंच फोटोला उभ्या राहिल्यासारख्या अगदीं जवळ जवळ उभ्या असतात. 'कस्टमस' च्या संबंधाचे त्रास देण्याचें हेंच तें ठिकाण. आपणांजवळ असलेल्या मौल्यवान वस्तूंची यादी करून द्यावी लागते. स्वतःच्या लाख मोलाच्या प्राणाशिवाय माझ्याजवळ इतर कांहीं मौल्यवान नसल्यामुळें माझें काम लवकर झालें. सौ. ने मात्र बांगड्या, मंगळसूत्र त्याचा घाट इत्यादि बारीक तपशील लिहून तेथील अधिकाऱ्याच्या चेहऱ्यावर स्मिताची एक बारीक रेषा ओढली. ह्याच ठिकाणीं बंगालचा उपसागर आणि अरबी समुद्र एकमेकांना भेटतात. हे दोन समुद्र जोडण्याच्या रेषा आम्ही शोधण्याच्या प्रयत्नांत असतांनांच बोटीने भारताचा किनारा सोडला. फक्त १३० उतारू घेवून बोट अगदीं संथपणे पाणी कापीत चालली होती. अथांग पसरलेलें हिरवे निळे पाणी आणि दूर दूर जाणारा भारताचा किनारा पाहून

असंख्य विचार मनामध्यें येत होते. आम्हाला १५ दिवसांत खात्रीनें परत यावयाचे म्हणून आम्ही आनंदात होतो. परंतु जन्मठेपीची शिक्षा झालेल्या श्री. सावरकरांना भारताचा किनारा सोडतांना काय झालें असेल हा विचार मनांत आल्यावर मात्र मन विषण्ण होते आणि डोळे पाणावतात

### तलाई मन्नार

हा धक्का म्हणजे सिलोनचे 'घनुष्कोडी' बाकी कांही फरक नाहीं. कस्टमस एक्सेंज, इत्यादी भानगडी परत उरकाव्या लागतात. बोटींतून उतरून गाडींत बसल्यावर मात्र हायसें वाटतें. येथील गाड्या ब्रॉडगेजच्या आणि डिझेलवर चालणाऱ्या, ऐसपैस अशा आहेत. प्रत्येक डब्यांत धर्मोपदेशकांना ( clergys ) जागा राखून ठेविलेल्या असतात. हे केवळ 'निधर्मिक' सरकारच्या माहितीसाठीं. गाडींत प्रशस्त अशी 'डायनिंग हॉल' असल्यामुळें प्रवासांत खूप मजा आली. सिलोनमध्यें 'मद्यपान बंदी' नसल्यामुळें भारतांत ह्या पानाला मुकलेल्यांची खूपच सोय झाली. तळाई मन्नार ते कोलंबो हा सर्व प्रवास नारळीच्या केळीच्या आणि रबराच्या अशा बागां मधून होत असल्यामुळें मजेशीर होतो. वाटेंत 'मन्ताई' 'मुरूनकुन' 'अनुराधापूर गैगामुवा' अशीं चमत्कारिक नांवाची स्टेशनें लागतात. पैकीं फक्त अनुराधापूर जवळचे असें वाटतें. कोरी कॉफी किंवा कोरा चहा विकावयास येई पण दुधाशिवाय चहा कॉफी घेण्यास मन धजत नसे. गाडींत आमचे नवखे चेहरे आणि विशेषता आमच्यांतील विद्यार्थीनींचा भारतीय पोशाख पाहून सर्वजण कुतुहलानें बघत असत. सिलोनी स्त्रीया खांद्यांवरून पदर न घेतां तसाच शरीराभोंवती गुंडाळतात. मला वाटतें एकादी सिलोनी स्त्री आपल्या शेजारणीला सांगत असेल. अगदींच मेल्याना लाज नाहीं. खांद्यावर पदर घेवून खुशाल चारचौघांत बसल्या आहेत ह्या बायका.'

### कोलंबो

दुसऱ्या दिवशीं सकाळीं भगवान सूर्यनारायणाने आणि आम्ही एकदमच कोलंबो शहरांत प्रवेश केला. मद्रासच्या Egmore स्टेशन प्रमाणें येथेहि मोटारगाड्या अगदीं गाडीच्या डब्यापर्यंत येवूं शकतात. ४। लाख वस्तीचें हे शहर मुंबईच्या मशीद विभागाची आठवण करून देते. प्रामुख्याने नजरेंत भरणारी गोष्ट म्हणजे येथील मोटारी. नाना आकाराच्या, देशाच्या, बनावटीच्या ह्या मोटरी म्हणजे कोलंबोचें वैभव आहे. टॅक्सी ओळखण्याची खूण म्हणजे तांबडा क्रमांक. बाकी खाजगी गाड्यांत आणि टॅक्सींत इतर कांही फरक नाहीं. टॅक्सीज इतक्या सुकाळाच्या आहेत कीं माणसाला टॅक्सी शोधावी लागतच नाही, तर टॅक्सी माणसाला शोधत येते. येथील दुकाने मजेशीर असतात. साध्या हॉटेलमधेंही 'रेडिओ' ट्रॅन्झीस्टर, कॅमेरे विकावयास ठेवलेले आढळतात. कांहीं डीपार्टमेन्टल स्टोअर्स खूप मोठाले आहेत. कांही तर ३।३ मजली आहेत. आयात होणारा सर्व माल Duty free असल्यामुळें फारच स्वस्त असतो. येथील बसेस ट्रॉली बसेस परदेशाची चुणुक दाखविण्याइतक्या सुंदर आहेत.

कोलंबोची चौपाटी Beach अत्यंत रेखीव आणि अतिशय मेहनत घेवून तयार केलेली अशी आहे. ८० ते १०० फूट रुंदीची जोपासना केलेली हिरवळ, त्यानंतर ३० ते ४० फूट रुंदीचा लाल वाळूचा पट्टा व लगेच निळेभोर पाणी. विशेष म्हणजे पाण्यांत प्रवेश करण्यासाठीं वाळू तुडवावी लागत नाहीं. अशा हा तिरंगी पट्टा म्हणजे कोलंबोचा दिमाख आहे, आणि ह्या खजिन्याचे रक्षण करण्यासाठींच कीं काय शेजारी खूप उंच आणि भव्य असे दिपगृह आहे.

शहराच्या एका टोकाला 'देहीवाला झू' हे जगांतील दुसऱ्या क्रमांकाचे प्राणि संग्रहालय आहे. एवढे प्रचंड संग्रहालय परंतु तेथील व्यवस्था इतकी चोख आहे कीं गाईड शिवाय सर्व भाग बघतां येतात. रोज संध्याकाळीं हत्तीचा खेळ दाखविण्यांत येतो.

कोलंबो ते मौंट लॅव्हीना ह्या ७ मैलांच्या प्रवासांत गाडी नेहमी समुद्राच्या अगदीं कडे कडेने जात असते. खुद्द मौंट लॅव्हीना हे हॉटेल मात्र 'जुहू' च्या एकाद्या मोठ्या हॉटेल सारखे आहे.

### कॅंडी

कोलंबो ते कॅंडी हा ७० मैलांचा प्रवास मात्र न चुकतां मोटारनेच करावा, किंबहुना सिलोनमध्यें गाडीने प्रवास करूंच नये, कारण गाडीच्या घुमणाऱ्या आवाजाचा फारच त्रास होतो. सिलोनमधें सर्वत्र डांबरी रस्ते आहेत. आमच्या ४/५ शें मैलांच्या प्रवासांत एकाहि ठिकाणीं रस्ता उकरलेला, खराब झालेला, किंवा दुरूस्तीसाठीं काढलेला दिसला नाहीं. अगदीं खडी दाबायाचा रोलर सुद्धां नजरेस पडला नाहीं. एकाद्या कलावंताच्या रुबाबांत आणि भरपूर वेगांत तेथील ड्रायव्हर आपली गाडी चालवित असतो. ह्याच मार्गावर प्रसिद्ध 'कॅजू गर्ल्स' भेटतात. काजूच्या नांवाखाली थोडक्यांत मौज करूं देणाऱ्या ह्या तरूणी म्हणजे रंगेल प्रवाशांचे एक आकर्षण आहे.

समुद्रसपाटीपासून १६०० फूट उंचीवर असलेले कॅंडी हे पूर्वीच्या राजधानीचे शहर आहे. सुंदर अशा तलावाकाठीं असलेले Tooth Temple हे बुद्धांच्या यात्रेचे एक ठिकाण आहे. जुलैऑगस्ट मधे भरणाऱ्या 'पेरा हेरा' या उत्सवास मात्र जरूर हजर रहावे. शंभराचे वर सुशोभित हत्ती, चित्रविचित्र पोशाख केलेले नगारेवाले आणि असंख्य नृत्यकार यांचा हा मेळावा अनेक दिवस भरत असतो. कॅंडीकरांची ही दिवाळी असते. Bridge on the river kwai हा सुप्रसिद्ध इंग्रजी चित्रपट ह्याच भागांत संपूर्णपणे घेण्यांत आला.

शहराच्या बाहेर सिलोन विश्वविद्यालयाच्या इमारती आहेत. इतका रम्य आणि निसर्गसौंदर्यानें नटलेला परिसर फारच थोड्या विश्वविद्यालयांच्या वांट्यास येत असेल. त्यांतहि आणखी आकर्षण म्हणजे येथील विद्यार्थीनींचे आणि विद्यार्थ्यांचे प्रमाण २ : १ असे आहे. प्रवेश मिळविण्यासाठीं जरूर प्रयत्न करावा. कॅंडीची बाजारपेठ छोटीशी पण टुमदार अशी आहे.

येथूनच कांहीं मैलांवर 'नुवारा एली आ' हें थंड हवेचें ठिकाण आहे. येथील सरासरी उष्णतमान ५५° फॅ. इतके असते.

### सिगिरीया

हे ठीकाण म्हणजे सिलोनमधील 'अजिंठा वेरुळ' असे सांगण्यांत येतें परंतु उंच कड्यावर कोरलेलीं १०।१२ चित्रें ह्या पलीकडे येथें कांहीं नाहीं. खरी मजा आहे ती ही चित्रें पहाण्यासाठीं कराव्या लागणाऱ्या श्रमांत. लोखंडी बार लावलेले असून सुद्धां चढतांना भीती वाटावी इतक्या उंचीवर ही चित्रें आहेत. मग त्यावेळीं इतर कांहीं साधने नसतांना ही चित्रें कशी काढलीं असतील हा विचार








आल्यावर मात्र मन थक्क होऊन जातें. त्याच तुटलेल्या कड्याच्या-वर पूर्वीच्या काळीं राजवाडा होता असे सांगतात. अजूनहि चौथरे वगैरे दृष्टीस पडतात. मात्र त्यासाठीं अतिशय बिकट अशी ऊंच आणि बिकट अशी चढण चढून जावी लागते.

### पुलुनुरूवा

बारव्या शतकांत वैभवाच्या शिखरावर असलेलें हें शहर आज उध्वस्त अशा स्थितींत दिसतें. जागजागीं असलेले चौथरे, आणि मधून मधून दिसणारे ते पडके खांब जणूं गेले ते दिवस असे सांगत आहेत असें वाटते. बुद्ध लोकांचे विहार (मठ) ह्या गावांत खूप आहेत. 'गाल विहार' ह्या मधील मूर्ति सुरेख आहेत. 'रानकोट विहार' येथील 'डॅगाबा' (स्तूपाचाच एक प्रकार) १८० फूट उंच आहे. पुलुनुरूवा मधील हा सर्वांत उंच डॅगाबा या इतिहास प्रसिद्ध शहरांत 'इरीगेशन' खात्याने दुरस्त केलेला प्रचंड तलाव व सरकारने बांधलेले Rest house ह्या दोन गोष्टीच प्रामुख्याने लोकांच्या नजरेंत भरतात.

### अनूराधापूर

सिलोन मधील हे सर्वांत पुरातन शहर. २००० वर्षापूर्वी 'देवप्रिय' नांवाच्या राजानें भारतांतील पवित्र बोधिवृक्षाची फांदी आणून येथे लावली. आज ती एखाद्या वृक्षाच्या स्वरूपांत पूज्य झाली आहे. वास्तविक ह्या शहराला 'डॅगाबापूर' हे नांव जास्त शोभून दिसलें असतें इतके 'डॅगाबा' ह्या शहरांत आहेत. 'तुपाराम' नांवाच्या एका डॅगाबांत भगवान बुद्धाचे Collar bone ठेविले आहे असें सांगण्यांत येते. दिवसभर अनुराधापूर हिंडून रात्रीं Rest house मधें आलो तेव्हां कळलें कीं आज रात्रीं आपल्याला परत जावयासाठीं निघावयाचे आहे.

गेल्या आठ दिवसांत खूप गंमती झाल्या. एका बुद्ध विहारांत डोक्याचा तुळतुळीत गोटा आणि अंगभर भगवे वस्त्र गुंडाळलेले अशा एका तरुण बुद्ध भिक्कूची माझी ओळख झाली. १५/२० मिनीटें तो मला सर्व माहिती आपल्या बारीक आवाजांत सांगत होता. शेवटी 'तुमच्याकडे कांहीं पोस्टल स्टॅंपस् आहेत कां ? असें मला विचारलें आणि म्हणाला मला तुमचा पत्ता द्या म्हणजे मी तुम्हाला आमचे स्टॅंपस् पाठविन आणि तुम्ही मला इंडीयाचे स्टॅंपस् पाठवा' मी माझा पत्ता त्याला दिला आणि त्याने त्याचा पत्ता लिहावयास सुरुवात केली आणि प्रथम नांव लिहिलें Rev. Miss. लोचनप्रिया' C/o इत्यादी इत्यादी.

### शेवटचा धक्का

सकाळीं तलाईमन्नार येथें आलों. प्रत्येकाने थोडी फार किंवा फार थोडी तरी खरेदी केली असल्यामुळें कस्टमसच्या तावडींत आपण सांपडू कीं काय अशी प्रत्येकाला भीती होती. बाकी येथून भारताकडे जाणाऱ्या प्रत्येकाकडे पेन्स्, थर्मास्, मोठमोठाल्या बॅगस्, घड्याळें वगैरे दृष्टीस पडतात. कांहीं कांहीं धंदेवाईक स्त्रिया आपल्या अंगावर इतके अलंकार घालतात कीं असें वाटतें कीं यांना परस्पर हरीवल्लभदास, च्या 'शोकेस' मधे नेऊन ठेवाव्यात. अर्थात अशा लोकांची कडक तपासणी होते. खाजगी वेषांतील Detectiveहि इतरत्र फिरत असतात. मला एकीकडे नेऊन तेथील अधिकाऱ्यानें विचारलें 'तुमच्यापैकीं कोणाजवळ चोरटे सोने वगैरे नाहीं ना ? मी' 'नाहीं' असें सांगतांच त्यानें जावयास सांगितलें आणि तात्बडतोब सर्वांच्या बॅगस्वर 'सबठीक' च्या फुल्या मारल्या.

जरा वेळानें बोट सुटली. दूरदूर जाणारा सिलोनचा किनारा पहाण्यापेक्षां कधी एकदां भारताची धनुष्कोडी पहावयास मिळेल ह्या एकाच हेतूनें आम्ही डेकच्या विरूद्ध बाजूला जाऊन उभे राहिलों.

● ● ●









अगदीं खासगी

हं ....सखे

प्रत्येकजण टिनोपाल वापरतो !

तुमच्या कपड्यांविषयीं काय ? तुमच्या पांढऱ्या सुती व रेयॉन कपड्यांसाठीं तुम्ही टिनोपाल वापरतां काय ? सफेत कपडे नुसते धुतले म्हणजे झालं असं नाहीं. धुतल्या-नंतर त्यांना टिनोपाल मिश्रणांत बुडवून काढा व ते किती निराळे दिसतात तें पाहा ! तुमच्या धोब्यालाहि टिनोपाल वापरावयाला सांगा ! टिनोपालनें खरोखरीची काटकसर साधते – तुमच्या घरांतल्या सगळया माणसांच्या कपड्यांसाठीं थोडेसें टिनोपाल पुरेसं होतं ! हो, आजच घेऊन या !






टिनोपाल हा जे. आर. गायगी एस. ए. बाल, स्वित्झर्लंड यांचा रजिस्टर्ड ट्रेड मार्क आहे.

थोड्याशा

# टिनोपाल ने

सफेद कपडे सर्वांत अत्यंत शुभ्र बनतात.

तयार करणार :
सुहृद गायगी लिमिटेड, वडी वाडी, बडोदा ● सोल डिस्ट्रिब्युटर्स :
सुहृद गायगी ट्रेडिंग लिमिटेड, पो.ऑ.बॉक्स ९६५, मुंबई-१

SISTA'S-137A MAR



# करायला गेलों एक

*...शीतपेटिका उघडून पाहतात तों ॲपलची चतकोर पोळी कोणीतरी गट्ट केली होती. डिटेक्टिव्ह म्हणाले, "किती निगरगट्ट माणूस असावा! काकूंचा खून करून नंतर त्यानें ही पोळी खाल्ली..."*

गल्फच्या किनाऱ्यावरील क्वीन शहरांतील ही हकीगत! त्या शहरांत ॲटकिन्स आडनांवाची एक बाई राहत होती. तरुण वयांत तिनें आपला पती गमावल्यामुळें हेफरनॅन नांवाच्या शेजाऱ्यानें तिला खूप मदत केली. पुढें परिस्थिती सुधारल्यावर अटकिन्सकाकूंनीं एक खाणावळ घातली. ती खाणावळ अगदीं जोरांत चालूं लागली. पुढें खाणावळीच्या जोडीला काकूंनीं पुढील दारीं एक किराणामालाचं विकान घातलं. दररोज सकाळीं नियमितपणें हेफरनॅन त्या विकानांत जात व काकूंशी खूप वेळ गप्पा मारत. नंतर स्वतःच्या नोकरीवर निघून जात. ते सेवानिवृत्त झाल्यानंतरसुद्धां त्यांचा हा नियम चालूच होता.

अशाच एका रविवारी सकाळीं नेहमींप्रमाणें ते काकूंच्या विकानाकडे निघाले. विकामांत आल्यावर पाहतात तों तें बंद. म्हणून त्यांनीं दरवाजा ठोठावला. पण उत्तर नाहीं. 'सिलीया' 'सिलीया'









म्हणून त्यांनीं काकूंच्या नांवानें हांका मारल्या. तरीहि उत्तर नाहीं. दार उघडायला कोणी येत नाहीं हें पाहून शेजारी असलेल्या खिडकींतून हात घालून हेफरनॅननीं दरवाज्याची कडी काढली व ते लगबगीनें आंत गेले. 'सिलीया' म्हणून हांका मारीतच होते. ते झोपण्याच्या खोलींत येतांच त्यांनीं तेथें जो प्रकार पाहिला तो ते जन्मभर विसरणार नाहींत!

चौपन्नीच्या घरांत आलेल्या सिसिलीया ॲटकिन्सचा देह तेथें अस्ताव्यस्त पडला होता!! त्यावर अर्धवटपणें चादर होती. पाहतांक्षणीं कोणीहि सांगितलं असतं कीं काकू खलास झाल्या आहेत! २२ रायफल त्यांच्या प्रेताशेजारी पडलं होतं. ही रायफल स्वतः काकूंची होती. हा प्रकार पाहून भांबावून गेलेल्या हेफरनॅननीं ताबडतोब पोलीसांना सगळी हकीगत कळवली.

हां हां म्हणतां ॲटकिन्सकाकूंच्या खूनाची बातमी सर्वत्र पसरली. जो तो काकूंच्या खाणावळींत गर्दी करूं लागला. डिटेक्टीव्ह डी. एम्. फुल्टस यांच्याकडे खुनी शोधण्याची कामगिरी सोंपविण्यांत आली. म्हणून ते खाणावळींत येतांच हेफरनॅन त्यांना म्हणाले, असे इकडे या!' आणि त्यांनीं काकूंचं शव होतं त्या खोलींत नेलं. फुल्टसनीं आजूबाजूच्या सर्व वस्तु तपासल्या. चौकशीअंती त्यांना असं समजलं कीं ह्या खाणावळींत बाहेरून आंत यायला दोन दरवाजे आहेत. एक पुढून विकानांतून व दुसरा मागीलदारी असलेल्या स्वयंपाकघरांतून. हेफरनॅनच्या सांगण्याप्रमाणें मागचा दरवाजा नेहमीं बंद केलेला असायचा. फुल्टस्ना असंहीं आढळून आलं कीं बिछान्याभोवतीं तसेंच शेजारच्या खोलींत व त्या खोलींत असलेल्या खिडकीवर रक्ताचे डाग सांडले आहेत. खिडकी तुटलेली दिसत होती!

## शर्विलक

विकानाची इत्थंभूत माहिती असलेल्या हेफरनॅननीं फुल्टसना ताबडतोब सांगितलं कीं विकान कोणीतरी लुटलं आहे खास. कारण पैशाच्या दोन पेट्या कुठें दिसत नाहींत; सिगारेटस्चे कांहीं डबे गडप झालेले दिसताहेत, एवढंच नाहीं तर व्हिस्कीच्या बाटल्याहि नाहींशा झाल्या आहेत; व मुख्य म्हणजे काकूंना त्यांच्या आईनें भेट म्हणून दिलेली पैशाची पर्ससुद्धां कुठें दिसत नाहीं.

सगळी पाहणी झाल्यावर फुल्टस्नीं निष्कर्ष काढला कीं विकानांत चोरी करायला आलेल्या चोरानें काकूंचा खून केला आहे! वास्तविक पाहतां काल रात्रीं ९–३० पर्यंत स्वयंपाकघरांत बसून हेफरनॅन काकूंशी गप्पा मारीत होते. गप्पा चालू असतांनाच काकूंनीं ॲपलची पोळी व पींचपासून थंडगार पेय तयार केलें. ते दोन्ही पदार्थ त्यांनीं मग शीतपेटिकेंत ठेवले.

ताबडतोब फुल्टस्नीं शीतपेटिका उघडून पाहिली. पाहतात तों ॲपलची चतकोर पोळी कोणीतरी गट्ट केली होती. पेय मात्र जसेच्या तसे होते! 'किती निगरगट्ट माणूस असावा! काकूंचा खून करून नंतर त्यानें ही पोळी खाल्ली असावी!!' फुल्टस् उद्गारले.

काकूंच्या शवाची तपासणी केल्यावर असं आढळून आलं कीं त्यांना चार वेळां गोळ्या मारलेल्या आहेत. त्यांतील दोन पोटांत मारल्या होत्या. एक नेम धरून हृदयांत मारली होती व उरलेली छातीच्या उजव्या भागांत मिळाली!

फुल्टस् ह्यांनीं ह्या सर्व प्रकरणावरून असा तर्क लढवला कीं हेफरनॅन गप्पा मारून गेल्यावर ॲटकिन्स काकूंनीं स्वयंपाकघरांत कपबश्या विसळायला सुरुवात केली असावी. त्या हें काम करीत असतांनाच खुनी आंत आला असावा व त्यानें काकूंवर हल्ला केला असावा. हें पाहून जोरानें काकू झोंपण्याच्या खोलींत गेल्या असाव्यात व स्वतःच्या बिछान्याखालीं असलेलं ३८ पिस्तुल मिळविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला असावा. परंतु खुनी माणसानें त्यांच्याकडून तें पिस्तुल हिसकावून घेतलं असावं!

पण ह्या दयाशील बाईचा खून होण्याचं कारण काय? असा तिनें काय गुन्हा केला होता? हा खून केला तरी कोणी? वास्तविक पाहतां काकू अजातशत्रु होत्या. शेजाऱ्यापाजाऱ्यांना त्यांनीं कितीतरी मदत केली होती. खानावळींत भरमसाट उधारी देत. गेल्या दोन वर्षांत ४०,००० रुपयांचा हिशेबच लागत नव्हता. एवढंच नाहींतर उधारी असलेल्या लोकांना त्यावर कर्ज देत. अशी ही दानशूर बाई! तिचा खून कां व्हावा?

जमलेल्या गर्दीतील एक माणूस म्हणाला, 'मीं रात्रीं एक-दीडच्या सुमारास कोणीतरी 'मेरी, मेरी' अशा हांका मारतांना ऐकलं.' मेरी डेन्सन ही काकूंची अगदीं जिवाभावांची मैत्रीण. पण ती स्वतः म्हणाली कीं तिनें वा तिच्या नवऱ्यानें अशा हांका ऐकल्या नाहींत.

इतक्यांत हेफरनॅननीं एक महत्वाची बातमी सांगितली. ते म्हणाले, "काल दुपारी मुरंब्याच्या बरण्या चोरतांना एका माणसाला काकूंनी पकडला होता, व मींच त्या माणसाला बाहेर हांकलून दिला" त्यांनी पोलिसांना त्या माणसाचं नांव सांगितलं. त्यांनीं सांगितलेली दुसरी एक हकीगत अशीच विलक्षण होती. खाणावळींत काम करणाऱ्या एका नोकरानें काल संध्याकाळीं ६० रुपये काकूंकडे उसने मागितले. काकूंनीं ते देण्यास नकार दिला, कारण आदल्याच दिवशीं काकूंनीं त्याला पैसे दिले होते व ते त्यानें खुशाल दारू पिण्यांत उधळून लावले होते. तो नोकर आज सकाळीं नोकरीवरहि आलेला नाहीं.



ही दुसरी हकीगत ऐकतांच फुल्टसचे डोळे चमकले. हाच माणूस परत आला असावा व काकूंचा खून करून चालता झाला असावा. शक्य आहे ! शक्य आहे !

पोलिसांनीं दोन्ही माणसांच्या झडत्या घेतल्या. मुरंबा चोरणारा म्हणला, आपल्याला बुवा ही बाईच माहिती नाहीं. त्याला फार छेड-ल्यावर ५६ वर्षाचा तो वृद्ध म्हणाला, " अच्छा मी विकानांत चोरी केली हें मला कबूल आहे. ॲटकिन्सकाकूंनांहि मी ओळखतों हेंहि मला कबूल आहे. पण मी त्यांचा खून केला हे मात्र मला कबूल नाहीं. पुराव्या अभावी त्या माणसाला सोडून देण्यांत आलं.

नंतर पोलिसांनीं काकूंच्या नोकराची झडती घेतली. पण पोलि-सांना जेव्हां तो सांपडला, तेव्हां तो दारु पिऊन झिंगला होता. त्याची दारु उतरल्यावर पोलिसांनीं त्याला विचारलं " तूं काकूंचा खून केलास नां ?" तसा तो म्हणाला, काकूंची माझ्यावर माया होती. मीं काकूंचा खून बिलकूल केला नाहीं. शनिवारीं रात्रीं तर मी मित्रां-बरोबर दारुच्या गुत्त्यांत गेलों होतों, व माझी दारुची नशा ही आतां उतरते आहे ! परंतु पोलिसांनीं, त्याचीं खोटं बोललेलं ज्या यंत्रावरून अचूक समजतं त्या यंत्राच्या साह्यानं तपासणी केली अखेरीस त्या नोकराचं म्हणणं खरं ठरलं !

एवढं होऊनहि डिटेक्टीव्ह फुल्टस् व कॅप्टन वेकॉट् निराश झाले नाहींत. खुनी माणसाचा शोध त्यांनीं जारीनें चालू ठेवला ! तपासाअंती वेकॉट्ना असं समजलं कीं दर रविवारी ५० वर्षांचा एक वृद्ध माणूस काकूंच्या खाणावळीची झाडलोट करायला यायचा. परंतु गेल्या रविवारीं सकाळीं म्हणजे खुनाच्या दिवशीं तो आला नाहीं. एवढंच नाहीं तर त्या दिवशीं जी गर्दी जमली होती, त्या गर्दी-तहि तो नव्हता. ताबडतोब पोलिस त्याच्या घरीं गेले. पण तो साफ म्हणाला, 'आपण बुवा दारूच्या गुत्त्यांत होतो ! शिवाय माझी तब्येत बरी नसल्यामुळें मी शनिवारीं रात्रींच गुत्त्यांतून तडक घरीं गेलों.'

पण त्याची बायको म्हणाली, 'आपला नवरा शनिवारीं रात्रीं घरीं नव्हता ! ' पण गुत्ता चालवणारी बाई म्हणाली, 'हा माणूस शनिवारीं रात्रीं माझ्या गुत्त्यांत होता.' हें ऐकल्यावर पोलि-सांना त्या माणसाला सोडून द्यावं लागलं. आणखी एक संशयी माणूस अशा तऱ्हेनें सुटला !

दिवस निघून जात होते. खुनी अजूनहि कुठें सांपडत नव्हता. पोलिसांनीं जंगजंग पछाडलं. पण पोलिसांना तो खुनी मिळायचा नव्हताच. मिळायचा होता तो दुसऱ्या एका माणसाला. त्याचं नांव होतं रॉबर्टसन, पोलिसखात्यांतला एक संशोधकी ऑफिसर. सगळेजण त्याला 'क्ल्यू' म्हणत. कुठल्याहि गोष्टीबाबत तो खूप दिवस विचार करी व एकदम धागा-दोरा मिळवून देई. या खूनाचा तो एकीकडे असाच विचार करीत होता. भुरट्या चोऱ्या करणाऱ्या असंख्य गुन्हेगारांना रोज पोलिस-चौकींत पोलीस आणीत. त्या सर्व भुरट्या चोरांना 'क्ल्यू' अभ्यासनीय वृत्तीनें न्याहाळी.

मंगळवारीं २१ मार्चला असाच एक धिप्पाड कैदी पोलिसांनीं आणला आणि रॉबर्टसनचे त्याच्याकडे लक्ष गेलें. त्याला त्या कैद्याबाबत कुतूहल निर्माण झालें. तपास करतां त्याला असं कळलं कीं बेफाम गतीनें मोटार चालविण्याबद्दल त्याला पकडण्यांत आलं होतं. त्याच्याबाबतची पोलिसखात्याची नोंद पाहिली तेव्हां असं आढळून आलं कीं अशा तऱ्हेनें बेफाम मोटार चालविण्याबद्दल त्याला अनेकवेळां पकडण्यांत आलं होतं. त्या कैद्याचं नांव होतं जॉन जुनिअस लेव्हन. तो ३२ वर्षांचा होता. रॉबर्टस-ननें जेव्हां लेव्हनचा घरचा पत्ता पाहिला तेव्हां त्याचे डोळे एका विलक्षण गतीने चमकले. लेव्हन टेरी पथावर राहत होता. म्हणजे ॲटकिन्सकाकूंच्या घराशेजारी. एक दोन बंगलेच काय ते दोघांच्या घरामध्यें होते.

" क्ल्यू " ताबडतोब फुल्टसना भेटले व म्हणाले, " लेव्हन हा अटकिन्सकाकूंचा खुनी असावा असं मला वाटतं.'

हे ऐकतांच फुल्टस म्हणाले, " छे शक्य नाहीं. आम्हीं त्याची तपासणी केव्हांच केली आहे." यावर राबर्टसन म्हणाला, " पण तुम्हीं त्याची मोटार तपासली नाहीं ती तपासा"

ताबडतोब फुल्टस व इतर अधिकारी लेव्हनची मोटार तपा-सण्याकरतां निघाले. सगळी मोटार तपासली पण कांहीं मिळालं नाहीं. शेवटी कोणीतरी मागची सीट उघडली आणि काय आश्चर्य ? सीटच्या आंत काकूंच्या दुकानांतून चोरीला गेलेल्या सगळ्या वस्तु होत्या !! ती त्यांच्या आईनें दिलेली पर्स होती, त्या पैशाच्या दोन पेट्याहि होत्या. सगळ्या वस्तु होत्या !! फुल्टसना कोण आनंद झाला. लेव्हन-नेंच काकूंचा खून केला होता, ह्यांत आतां शंका नव्हती. "क्ल्यू"ची त्यांनीं पाठ थोपटली. २२ चे पिस्तुलहि तिथेंच मिळालें. त्या पिस्तुलाची नीट तपासणी केल्यावर असं आढळून आलं कीं काकूंचा ज्या पिस्तुलानें खून झाला तें हेच !

कॅप्टन वेकॉटनें मग लेव्हनची उलटतपासणी सुरू केली. मिळालेला पुरावा त्याला सांगून त्याच्यावर खुनाचा आरोप ठेवण्यांत आला. तो ऐकल्यावर लेव्हन शांतपणें म्हणाला, 'मी खून केला पण खून करण्याचा माझा इरादा नव्हता.' मग लेव्हननें सगळीं कथा कथन केली. पोलिसांत दंड भरण्यासाठीं त्याला पैशांची अत्यंत गरज होती, म्हणून त्यानें काकूंच्या विकानावर डल्ला मारला. तो म्हणाला, ' मला कोणीहि नोकरी देईना. हे लक्षांत ठेवा कीं सामान्य माणसाला नोकरी मिळणं सोपं असतं; पण आम्हां गुन्हेगारांना ते तितकं सोपं नसतं. काकूंचं विकान मी दोन आठवड्यापूर्वी प्रथमच पाहिलं आणि मी ठरविलं कीं हें विकान लुटायचं ! शनिवारीं रात्रीं मीं खाणवळींत आलों. मागील दाराची कडी खिडकींतून हात घालून उघडली. नंतर मुद्दामच थोडा आवाज केला. पण काकू गाढ निजल्या होत्या. त्यांना त्या आवाजामुळे जाग आली नाहीं. पण मला काकूंना उठवायचं होतं; म्हणून मीं त्या निजल्या होत्या तो पलंग हलवला, त्याबरोबर त्या ताडकन् उठून बसल्या. मला पहातांच म्हणाल्या, ' तूं कोण आहेस ? व तुला काय पाहिजे ?' त्या बिछान्यांतून उठल्या व खुर्चीत जाऊन बसल्या. त्या खुर्ची शेजारींच त्यांची रायफल होती. क्षणाचाही वेळ न लावतां त्यांनी पटकन् माझ्यावर रायफल रोखली व मला गोळ्या मारायला सुरुवात केली. '

तो धिप्पाड बांध्याच्या लेव्हन पुढें म्हणाला, ' हें पाहतांच मीं खोलीबाहेर पळालों. त्यांनीहि माझा पाठलाग सुरु केला. माझ्याजवळ

अनुक्रमणिका






असलेल्या पिस्तुलानें मीं त्यांच्या हाताच्या रोधानें गोळ्या झाडल्या. जेणेंकरून ती रायफल त्यांच्या हातांतून गळून पडावी. मी एकदर चार गोळ्या झाडल्या. त्याचा परिणाम असा झाला कीं त्या झोंकाडी खात धाडकन् खिडकीवर आपटल्या व 'मेरी, मेरी' म्हणुन त्या ओरडल्या. नंतर त्यांनीं होती नव्हती तेवढी शक्ती एकवटून माझ्यावर हल्ला केले व मला जबदस्त मिठी मारली. माझें पिस्तुल त्यांनीं हस्तगत केली. परंतु मीं चपळाई करून त्यांच्या हातावर जोराचा फटका मारला व ते पिस्तुल खालीं पाडलं. त्या धाडकन् जमिनीवर कोसळल्या.

मग लेव्हननें दोरीनें त्यांचें हात बांधले व व्यवस्थितपणें विकान लुटलें. मग त्यानें काकूंची नाडी पाहिली. ती मंदगतिनें चालत होती. डॉक्टरांना बोलावण्याचा त्याचा विचार होता! पण कुठें फोन नव्हता!!

तो नंतर म्हणतो, 'मग मला सपाटून भूक लागली. मी शीतपेटी उघडून पाहिली तो त्यांत ॲपलची पोळी दिसली. चटकन् चतकोर पोळी मी खाल्ली. मग मीं बाहेर पडलों. मला एकंदर ५८० रुपये मिळाले. बस होते मला!!'

अशी ही लेव्हनची समग्र हकीगत होती. नंतर तो म्हणाला; "माझी एक विनंती ऐका. तुम्हीं मला तुरुंगांत नेण्यापूर्वी मला माझ्या घरीं न्या. माझ्या आईला मला भेटायचंय"

त्याला त्याच्या घरीं नेण्यांत आलं. आईला पाहतांच त्यानें हंबरडा फोडला, "आई!" नंतर त्यानें बायबल घेतल व त्यावर हात ठेवून तो स्वतःच्या आईला म्हणाला 'आई मी एक फार मोठा गुन्हा केलाय ग!' असं म्हणून त्यानें त्याच्या आईला सगळी हकीगत सांगितली. ती ऐकून ती माऊली रडूं लागली व 'पोराचं भलं कर' म्हणून येशूला विनवूं लागली.

लेव्हनला देहांत प्रायश्चित्ताची शिक्षा ठोठावण्यांत आली. पण तुरुंगांत असतांना पश्चातापानें तो इतका दग्ध होऊन गेला कीं त्या भरांत त्यानें आत्महत्त्या करण्याचा प्रयत्न केला. त्यानें शिक्षे-विरुद्ध 'अपील' केलं आहे. पाहूं या तो वांचतो कीं जातो!



# अंपायर माझा भला



चोख न्यायाबद्दल न्यायालयांत न्यायधीश जितका जबाबदार आहे तितकाच क्रिडांगणावर अंपायर जबाबदार आहे. तो सांगेल ती पूर्व दिशा! सगळेच अंपायर ही दिशा अचूक सांगतात असें नाहीं. कांहीं वेळां पश्चिम दिशेलाही ते पूर्व म्हणायला लावतात आणि त्यातूनच वातावरण धुमसतं.

वेस्ट-इंडिजमध्यें हे धुमसण्याचें प्रकार फार घडतात किंबहुना तेथील प्रत्येक व्यक्तीचें एक वेगळे वैशिष्ट्य असतें त्याप्रमाणें तेथील अंपायरही आपलं एक आगळं वैशिष्ट्य राखून आहे.

मागे इंग्लडचा संघ वेस्ट इंडिजमध्यें गेला असतानांची गंमत. गॉडफ्रे इव्हान्स् यष्टी सांभाळीत होता व जिम लेकर गोलंदाजी करीत होता. वेस्ट-इंडिजचा एक मामुली खेळाडू फलंदाजी करीत होता इतक्यांत 'विकेट' संपूर्णपणे 'कव्हर' करून खेळत असलेल्या त्या खेळाडूच्या पॅडला लेकरचा चेंडू लागला. सगळे इंग्लिश खेळाडू उच्चरवांत ओरडले-- 'How's That ?' तो फलंदाच निश्चितच 'पायचीत' झाला होता. पण अंपायरनें जराही हालचाल केली नाहीं. सगळे त्या अंपायरवर क्रुद्ध झाले. लेकर मनगट चावूं लागला हे पाहून दुसरा टोकावरील फलंदाज म्हणाला, "बाबारे, 'अपील'चा आरडाओरडा करून कांहीहि उपयोग होणार नाहीं, कारण त्या फलंदाजाचा हा अंपायर काका आहे. त्या फलंदाजाची सरळ यष्टी उडवा तरच तो बाद धरण्यात येईल. झेल व पायचीत नें नव्हें!"

इंग्लडचाच संघ वेस्ट इंडिजमध्यें असतांना घडलेली दुसरी एक गोष्ट. वेस्टइंडिज संघ फलंदाजी करीत होता. व त्यांची हॉट व वीक्टर ही जोडी बराच वेळ खेळत होती. ही जोडी फोडण्यासाठीं हटननें खूप प्रयत्न केले पण सगळे निष्फळ ठरले. शेवटी हटननें डेनीस कॉम्प्टनला गोलंदाजी दिली आणि काय आश्चर्य ! कॉम्प्टनच्या एका चेंडूवर हॉल्टचा झेल उडाला व 'स्लिप' मध्यें उभ्या असलेल्या ग्रॅव्हेनीनें तो अचूक पकडला. 'How's That ? चा वर्षाव झाला पण अंपायर अचॉगनें नॉट आऊट म्हणून चक्क सांगितलें व वर सुनावलें— हॉल्ट बाद होण्याचा प्रश्नच नाहीं. कारण चेंडू प्रथम जमिनीला लावला होता!

*गेल्या महिन्यापासुन सुरु झालेली* **श्री. आत्माराम नीलकंठ** *यांची एक अभ्यासपूर्ण व कसदार अशी लेखमाला दीपावलींतून क्रमशः प्रसिद्ध होत आहे. या लेखमालेच्या आवडी-निवडीविषयीं महाराष्ट्राच्या जवळ-दूरच्या भागांतून रसिक वाचकांची बरीच पत्रें येत आहेत. वाचकांनीं आपली निर्भीड व स्पष्ट मतें दीपावलीकडे अवश्य पाठवावींत, ती प्रसिद्ध केलीं जातील.*

# बायकोचेहिं वांटे केले




## भैक्षवद् भुज्यताम् : २

द्रौपदीच्या पांच पतींशी विवाह हा धर्मानें उपस्थित केलेला सर्वांत गहन प्रश्न आहे. खुद्द महाभारतकारांसहि तो प्रश्न धड सोडवितां आलेला नाहीं. हा विवाह कां व्हावा याला महाभारतांत कारणांवर कारणें दिलीं आहेत पण तीं सर्व बालिश असून त्यांवर खुद्द महाभारतकारांचाहि विश्वास बसणें शक्य नाहीं.

भिक्षेप्रमाणें वांटून घ्या ही मातेची आज्ञा हेंहि असेंच एक कारण आहे. अगदीं अक्षरावर बोट ठेवून आज्ञापालन करावयाचें म्हणजे अनेक प्रश्न संभवतात. भिक्षेची वांटणी स्वतः पांडव करीत नसत. कुंती ते वांटे करी. भिक्षेचे सारखे दहा भाग करुन त्यांतील पांच भीमाला व इतर पांच कुंती व दुसरे चार पांडव यांस एकेक असे मिळत. अडाणीपणानें आज्ञाच पाळावयाची तर मग भीमास अर्धी द्रौपदी इतर पांडवांस दहावा भाग आणि कुंतीसहि दहावा भाग अशी वांटणी हवी. इतकेंच नव्हे, तर अडाणीपणा परिपूर्णतेस नेण्यासाठीं द्रौपदीस भिक्षेप्रमाणें खावयासहि हवें तरच आज्ञापालनाचें यथार्थ पुण्य लागणार! प्रत्यक्षांत युधिष्ठिरानें द्रौपदीस छळून छळून व्यंग्यार्थानें खाल्लेलें असलें तरी तिची इतर वांटणी भिक्षेप्रमाणें झालेली नाहीं.

द्रौपदी आम्हां पांचाची व्हावी असें मला वाटतें आणि मला वाटतो तोच धर्म हें युधिष्ठिराचें मत या विवाहास दुसरें कारण होय. हेंहि कारण तर्कदुष्ट आणि हास्यास्पद आहे. परंतु ही कारणें हास्यास्पद असलीं तरी हा चमत्कारिक विवाह कुंती आणि धर्म या दोघांच्या आग्रहामुळेंच झाला. या दोघांचाहि या बाबतींतील अट्टाहास ठायीं ठायीं प्रकट झाला असून त्या अट्टाहासामुळेंच शेवटीं द्रुपदाला त्याच्या दृष्टीनें अवैदिक, अलौकिक, अनैतिक आणि अधार्मिक अशा या विवाहाला संमती द्यावी लागली आहे. या अट्टाहासाला प्रकट कारणें कुंती आणि युधिष्ठिर यांनी कांहींहि सांगितलीं असलीं तरी त्यांच्या अतर्मनांत कांहीं वेगळीच उलाढाल चालली असावी.

द्रौपदी ही श्यामा होती. संस्कृत साहित्यांत श्यामा म्हणजे काळी सांवळी स्त्री नव्हे तर तें एक महाकाव्य आहे. ( ती स्वतः शालीन साध्वी असतांहि ) जिच्याकडे पहातांच वासना चेतावतात अशी स्त्री श्यामा होय. द्रौपदी जगांतील सर्व स्त्रियांपेक्षां अधिक आकर्षक होती आणि त्रिभुवनाचें मन हरण करणारी होती. तिच्यावर दृष्टी पडतांच पांचहि पांडवांच्या इंद्रियांतून ( आदिपर्व १९०।१३ ) कामवासना प्रकट झाली. आणि भावांभावांत वितुष्ट यावयाचा प्रसंग प्राप्त झाला.

ही कामवासना शांतिब्रह्म युधिष्ठिराच्या इंद्रियांतहि प्रकट झाली होती. शिवाय वस्तुस्थिति अशी होती कीं भीमानें आपल्या पौरुषबलानें सालकटंकटा ही आदिवासी रमणी पत्नी मिळविलेली होती. अर्जुनानें आपल्या पौरुषानें आतां द्रौपदी मिळविली. मागच्या दोन भावांना त्यांच्या सामर्थ्यामुळें कांता लाभल्या. आपल्या पौरुषामुळें आपणांस कांता लाभणें कितपत शक्य आहे याचें यथार्थ ज्ञान इतर कुणापेक्षांहि युधिष्ठिराला स्वतःलाच असणें साहजिक आहे. कुणी राजानें त्याला सांगून मुलगी आणावी हेंहि अशक्यच. कारण तो अक्षरशः भिक्षा मागितलेल्या अन्नावर उपजीविका करीत असतो. लोकव्यवहाराप्रमाणें युधिष्ठिर जरी धर्माचें बाह्यात्कारी वर्तन ( आदि. १३।९५८ ) करीत असला तरी त्याचा मूळ स्वभाव स्वार्थी ( वन. ३४।३ ) असतो. अशा परिस्थितींत जेव्हां द्रौपदीला पाहून त्याच्या इंद्रियांत कामभाव जागृत होतो तेव्हां त्याला स्वार्थ सुचणें अपरिहार्य आहे. पण हा स्वार्थ भीम आणि अर्जुन यांना न दुखवतांच साधणें आवश्यक असतें. कारण त्यांच्या बळाशिवाय जिथें प्राणांचेहि रक्षण होणें कठीण असतें तिथें द्रौपदीसारख्या सुंदर कांतेचें रक्षण होणें संभवनीय नाहीं. या परिस्थितींतून ही समाईक सहकाराची कल्पना युधिष्ठिराला स्फुरली असावी.

आतां प्रसंगीं अशी कल्पना स्फुरली तरी ती प्रकट करावयास लोकलाजेचें बंधन असतें. या लोक लाजेला धर्म पूर्वींच्या पिढ्यांनीं असेंच वर्तन केलें आहे असा आधार देतो ( आदि. १९५।२९. ) यावेळीं युगानुयुगें पूर्वींच्या पिढ्या स्मरणाऱ्या युधिष्ठिराला आपल्या मातेचीच पिढी न आठवण्याचें कारण नाहीं. या मातेला सूर्य हा गुप्त आणि पंडु, इंद्र, यम आणि वायू हे प्रकट, असे पांच पती होते. सावत्र माता माद्री हिला तीन प्रकट पती होते. कुलपरंपरेचा एवढा आधार असल्यावर युधिष्ठिरानें आपला हट्ट निर्भयपणें प्रकट करावा यांत नवल नाहीं.



अनुक्रमणिका

ज्या ठिकाणीं दारिद्र्यामुळें अनेक भावांत एकच पत्नी करावयाची प्रथा अजूनहि आहे अशा प्रदेशांत पांडव जन्मले आणि वाढले. कोणत्याहि कारणानें अनेक पती करण्याचा धीर कुंतीला झाला तो भोवतीं समाजाचा आधार होता म्हणूनच. समाजबाह्य वर्तन करण्याची ताकद कुंतीला असती तर तिनें कर्णाचा त्याग केला नसता. युधिष्ठिरालाहि हा सहकाराचा मार्ग सुचला बोलण्याचा धीर झाला तो कुंतीचा हा आधार स्मरून नसण्याचें कांहीं कारण नाहीं. भरीला भर म्हणून मूळ समाजांतील अशा विवाहास कारण असणारें दारिद्र्यहि यावेळीं पांडवांशी होतें.

अशाप्रकारें युधिष्ठिराच्या आग्रहाला अनेक कारणें संभवतात. द्रौपदीस पाहून स्फुरलेली वासना, स्वार्थासाठीं सारासार विसरणारा (वन ३४।३) असा स्वभाव, पराक्रमी भावांस विरोध करण्याची असमर्थता, पौरुषानें बायको मिळण्याचा असंभव, बाह्य विवाहानें बायको मिळण्याचा असंभव, कुंतीनें घालून दिलेला धडा आणि अफाट दारिद्र्य यांतून धर्मानें हा समन्वय काढलेला असावा.

कुंतीचा आग्रहहि अशाच दृष्टीनें आपणांस कळूं शकतो. विधवेला सवाशीण पहावत नाहीं; तिचें आपल्यासारखें व्हावें असें वाटत असतें अशी एक कुडाळी म्हण आहे. त्यामुळें एकमेवाद्वितीय अशा परिस्थितींत असणाऱ्या कुंतीनें आपणांस सहधर्मचारिणी मिळण्याचा संभव प्राप्त झाला असतां आपल्या मानसिक समाधानासाठीं त्या संभवाचा मार्ग उचलून धरला असावा. शिवाय आपलें दारिद्र्य आणि पांच पुत्रांत उत्पन्न व्हावयास आलेली सुंदोपसुंदी त्या बुद्धिमति स्त्रीस न दिसणें संभवनीय नव्हतें. आणि त्यांतून मार्ग काढणें तिला आपद्धर्मांतील प्राप्त कर्तव्य होतें. ●●●

## ममापि दारसंबंधः कार्यः

## मलाहि बायको हवी : ३

धर्म हा अर्जुनाचा मोठा भाऊ म्हणून, द्रुपदानें त्याची रीतसर भेट घेतली आणि अर्जुन व द्रौपदी यांच्या मंगल अशा विधिवत् विवाहाला कोणता पुण्यदिवस निवडावा असा प्रश्न त्याला केला. तेव्हां युधिष्ठिरानें विषय बावलून त्याला उत्तर दिलें, 'विवाह मलाहि करावयाचा आहे.'

द्रुपदाला द्रौपदी ही अर्जुनालाच द्यावयाची होती. अर्जुनानें तिला जिंकलीहि होती. कशाचा म्हणून अडथळा येण्याचा संभव नव्हता. अशावेळीं युधिष्ठिराचें हें उत्तर ऐकून द्रुपद आश्चर्यानें थक्क झाला. युधिष्ठिराच्या या वर्तनास काय कारणें झालीं असावीं याचा आपण विचार केला. आतां भारतांत याचा काय बचाव दिला आहे तें पाहूं.

हा बचाव शांतिपर्व अध्याय ३४।३५ यांत आहे. तो असा कीं मोठा भाऊ अविवाहित असतां धाकट्याचा विवाह झाला तर उभयतांस पातक लागतें. धाकटा भाऊ परिवेत्ता या पाप पदवीस प्राप्त होतो तर मोठा भाऊ हा परिवित्ति या पाप पदवीस प्राप्त होतो. अर्थात युधिष्ठिर हा पापभीरू असल्यानें अर्जुनाचा आपल्या आधीं विवाह होऊं देत नाहीं असा हा बचाव आहे.

या बचावांत पहिलाच लंगडेपणा असा कीं अशा परिस्थितींत युधिष्ठिरानें द्रौपदी आपणा एकट्यासच घ्यावयास हरकत नव्हती. या गोष्टीला अर्जुन तयार होता. एवढेंच नव्हे तर आपल्या सुशील कन्येवर भलताच प्रसंग येऊं नये म्हणून द्रुपदहि तेंच सांगत होता.

याहून मोठा या बचावातील उणेपणा म्हणजे थोडेच दिवस आधीं जेव्हां भीमानें सालकटंकटा या आदिवासी स्त्रीशीं विवाह केला तेव्हां हा कायदा कोठें गेला होता बरें? ज्येष्ठ बंधू पतित अथवा संन्यासी असेल तर परिवेदनाचें पाप लागत नाहीं. भीमाचें लग्न होतें तेव्हां युधिष्ठिर पतित अथवा सन्यासी असतो असा उल्लेख नाहीं. सोलकटंकटा ही आदिवासिनी म्हणून जर युधिष्ठिरास अनुचित असें मानलें तर ती भीमास तरी उचित कशी? शिवाय ती युधिष्ठिरास अनुचित असणें शक्य नाहीं. क्षत्रियास फक्त ब्राह्मणकन्या स्वीकारण्यास अधिकार नव्हता. पण अनुलोम विवाह सर्वांस मान्य होते. पूर्वींच्या पिढ्यांत रांकेनें असे विवाह झालेले असून शिवाय शंतनू-मत्स्यगंधा हा विवाह पितृकुलांत दोन पिढ्यापूर्वींच झालेला होता. मातृकुलांत कुंतीची आजी आदिवासिनी होती.

या कालीं धर्मास या कायद्याचें ज्ञान नसावें असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण जेव्हा सालकटंकटा भीमास विवाहाची मागणी घालते तेव्हां तो 'मी परिवेत्ता कसा होऊं' असा प्रश्न विचारतो. म्हणजे त्यावेळीं पांडवांस या कायद्याचें ज्ञान असतें.



द्रौपदी परम सुंदर होती हें खरें. पण सालकटंकटा कांहीं कुरूप नव्हती. 'तिच्याहि भुवया, नासिका, नेत्र आणि केशाग्र सुंदर होते. तिचीं मने आणि त्वचा सुकुमार होती. तिच्या अंगावर सुंदर आभूषणें होतीं आणि ती अत्यंत तलम वस्त्र








नसलेली होती. तिचें अलौकिक रूप पाहून पांडव आणि कुंती थक्क झाले. ती वनदेवता अथवा अप्सरा असावी असें त्यांस वाटलें. कुंतीनें त्या सुशील आणि यौवनसंपन्न स्त्रीला निश्शंकपणें आलिंगन देऊन आपल्या मांडीवर घेतलें. '

अर्थात अशा स्त्रीला जेव्हां भीमाशीं लग्न करावयास युधिष्ठिरानें परवानगी दिली आणि तो प्रसंग साजरा केला तेव्हां वरील कायद्याप्रमाणें त्यास पाप लागलें नाहीं काय ? युधिष्ठिराच्या वागणुकींत हें असें अंतर पडावयाचें कारण काय बरें ?

एक कारण असें संभवतें कीं सालकंटकटा जरी सुंदर होती तरी ती द्रौपदीएवढी आकर्षक नव्हती. द्रौपदीकडे पाहून जशी युधिष्ठिराच्या इंद्रियांत वासना प्रकटली तशी तिला पाहून प्रकटली नाहीं. यामुळें युधिष्ठिरानें कायद्याची विवंचना न करितां भीमाशीं तिचा गांधर्वविवाह होऊं देण्याचा उदारपणा दाखविला' हा खुलासा मान्य होऊं शकला तरी तो युधिष्ठिराच्या चरित्रावर, नीतिमत्तामय अथवा कायदेशीर असा कोणताच उदात्त प्रकाश पाडीत नाहीं.

दुसरें कारण असें कीं द्रौपदी ही पणांत जिंकलेली होती तर सालकटंकटा ही अभिसारिका म्हणून भीमामागें आली होती. त्यामुळें मलाहि तूं हवीस असें आपण तिला म्हटलें तर ती आपणास धुडकावून लावील अशी भीती धर्मास वाटली असावी. असें मानलें तरी कायद्यांतून पळवाट ही निघतेच.

किंवा असें कीं द्रौपदी ही आर्य संस्कारांतील असल्यानें, आर्यांच्या कायद्यांनीं वठणीवर येण्याचा संभव होता. सालकटंकटा मुक्त मनांचे कायदे जाणत असल्यानें तिला आपला कायदा ऐकविण्यांत आपली बूज राखली जाणार नाहीं असें युधिष्ठिरास वाटलें असावें, म्हणजे हा कायदा युधिष्ठिरानें आपल्या सोयीप्रमाणें वापरावा अशाच योग्यतेचा होता.

कदाचित् असेंहि असूं शकेल कीं सालकटंकटा ही विशेष सुदृढ असल्यानें ती जशी भीमास शोभेल तशी आपणांस शोभणार नाहीं अशी कातरता धर्मास वाटली असावी. आणि त्यानें तिला तूं अगोदर माझी हो असें आवाहन केलें नसावें.

कांहींहि मानलें तरी द्रौपदीच्या विवाहाच्यावेळीं माझेंहि लग्न करावयाचें आहे म्हणून जो युधिष्ठिर पुढें सरला त्याला जो महाभारत कायद्याचा आधार दाखवितें तो केवळ लटका आहे. त्याला जीं जीं कारणें संभवतात त्यांतील एकालाहि उदात्तशील धार्मिकतेचा अथवा सामर्थ्यशील पौरुषाचा पुसटहि स्पर्श झालेला नाहीं. अत्यंत प्राकृत अशा स्वार्थाचा त्यांना येणारा दुर्गंध यशस्वीपणें लपविणें युधिष्ठिरास अथवा महाभारतास साधलेलें नाहीं. ● ● ●

(क्रमशः)




*कुंपणानेंच शेत खाल्लें तर काय करावें ? — मोठा गहन प्रश्न. पण हाच प्रश्न* **घाशिराम कोतवालचे** *कारकीर्दीत एका बोहऱ्यास पडला. त्यानें तो यशस्वी-रित्या कसा सोडविला त्याची ही कहाणी—*

# चोरावर मोर

एक बोहरी मण्यारी जिनसा व कांहीं ग्रंथ वगैरे विकण्याकरतां पाटींत भरून फिरत असे. तो कोतवाल चावडीवरून जात असतां, त्याला घाशीराम यानें बोलाविलें आणि तो त्याचें सामान पाहूं लागला. त्यावेळीं बोहरी एक ग्रंथ उचलून कोतवालास म्हणाला—

बोहरी : कोतवालसाहेब, हा ग्रंथ आपले संग्रहालयांत ठेवण्यास लायक आहे.

घाशीराम : कसला ग्रंथ आहे व त्याची किंमत काय ?

बोहरी : इंग्रजी भाषेंतला ग्रंथ आहे. यांत पृथ्वीवरील सर्व चमत्कार लिहिले आहेत; त्याचे शंभर शिक्का रुपये पडतील.

घाशीराम : ( चप्राशास हांक मारून ) अहो नाईक, आपला फिरंगी लिहिणार सोजा किरस्ताव याला हांक मारा. ( सोजा सिनोर आल्यावर त्यांस ) अहो ह्या ग्रंथांत काय आहे तें पहा.

सोजा सिनोर : ( ग्रंथाची पानें उलटपालट करून ) ह्यांत फारच चमत्कारिक प्रकरणें लिहिलीं आहेत. त्यापैकीं पहिल्या प्रकरणांत झोपेंत उठून फिरण्याची खोड कांहीं मनुष्यास असते ती विषयीं गोष्टी लिहिल्या आहेत. एक गोष्ट अशी आहे कीं कोणी मनुष्य झोपेंत आपले पाठीस पोळ लागला आहे असें त्यास स्वप्नांत दिसून एकाएकीं त्यानें आपले बिछान्यावरून उडी मारून घडवंचीवर चढावें; अथवा पळत सुटावें. एक दासी असे, तिनें झोपेंत हत्तुणावरून घराबाहेर जावें. त्या प्रसंगीं तिला कोणी कांहीं विचारलें असतां तिनें सावध असल्याप्रमाणें त्या प्रश्नाचें उत्तर द्यावें. तिचे आंगास टांचण्या अथवा दुसरे कांहीं बोंचलें तरी तिला तें समजत नसे. एक मुलगा रानांत फिरत असतां गांवाजवळचे एका डोंगराचे कड्यास चिमण्यांनीं केलेला घरोटा त्यानें पाहिला. तो आपले हातीं यावा अशी त्यास फार उत्कंठा झाली. परंतु कडा चढण्यास इतका अवघड व उंच होता कीं, तेथें हात तर नकोच पण काठी सुद्धां पोहचण्याची सोय नव्हती. त्यावरून कांहीं वेळ प्रयत्न करून तो मुलगा घरीं आला. परंतु त्याच्या मनांतून घरोटा गेला नाहीं. मग तो निजण्यास गेला. त्यास झोप येईना. कांहीं वेळानें झोप लागली. नंतर तो झोपेंतच बिछान्यावरून उठून अंधाऱ्या रानांत जावून, दिवसास पाहिलेला पक्षांचा घरोटा त्यानें आणून तो आपले बाजेखालीं ठेवून, तो मुलगा पुनः निजला. सकाळीं उठल्यावर पाहातो तों घरोटा बाजे खालीं आहे. परंतु आपण रानांत केव्हां गेलो, आणि अवघड कड्यावर चढून घरोटा कसा काढून आणिला, याचें त्याला कांहींच स्मरण राहिलें नाहीं. एक मनुष्य रात्रीं समुद्राचे खाडींत शिरून जलक्रीडा करीत आहे, असें तेथील बंदरावरील लोकांनीं पाहून त्याचे मागें नावा नेऊन त्यास त्यांनीं धरलें. तेव्हां बिछान्या वरून ओढतां कां ! ओढतां कां !" असें तो मनुष्य म्हणूं लागला. ते समयीं तो किनाऱ्यापासून अजमासें दोनशें हातांवर पाण्यांत गेलेला होता; व आतां तूं बुडशील असें नावाड्यांनीं त्यास सांगितलें, तरी तो तें कांहींच मानीना. शेवटीं त्यांनीं त्याला जबरीनें नांवेवर घालून कांठावर आणिले, पुढें त्याचे घराचा त्यांनीं शोध केल्यावरून असें कळलें कीं तो मनुष्य दोन प्रहररात्रीं आपले घरून निघून अवघड व भयंकर मार्गानें एक कोसपर्यंत चालून गेला होता, व नावकऱ्यांनीं त्याला जेथें पाण्यांतून काढिलें, तेथें तो अजमासे पाऊण कोस तरुन आलेला होता. पृथ्वीचे पोटांत गंधक आहे व कांहीं पर्वतांत गंधक असतो, त्या पासून बहुत ठिकाणीं उन्हाळी झाली आहेत व त्यांचा कित्येक ठिकाणीं मोठालीं कुंडें व तळीं स्नानाकरितां बांधिलीं आहेत. तसल्या एका कुंडावर एक मनुष्य स्नान करीत असतां, त्याला झोंप येऊन तो पाण्यावर उताणा पडला, तो तसाच अडीच घटका. पर्यंत निश्चल राहिला होता. एक विद्यार्थी वैद्यशास्त्र शिकत असे, तो निद्रेंत असतां त्याला त्या शास्त्राविषयीं प्रश्न केले असतां त्याची उत्तरें तो समर्पक देत असे. दुसरा एक विद्यार्थी खिस्ती धर्माचे ग्रंथ पढत असे, तो रात्रीं उठून आपले दिवसास आरंभिलेले काम झोपेंत पार करी आणि पुनः हत्तुणावर पडे. आणि सकाळीं उठल्यावर संध्याकाळीं करून ठेवलेल्या कामापेक्षां जास्त काम झालें हें पाहून ते कसें व केव्हां झालें याचा त्याचा तोच विस्मय करी. एक जवाहिरी धनलोभी होता. तो दिवसा धंदा करून जो पैसा मिळवी, तो एका बळकट पेटींत घालून तिला मोठे कुलुप लावून त्याची किल्ली आपलेपाशीं ठेवी. त्या पेटींत कांहीं शिल्लक जमली म्हणजे रात्रीं झोपेंत उठून पेटी उघडून तींतून पैका काढून ता, त्याचें आंतले खोलींत एक फडताळ होतें, त्यांत लपवून ठेवी. दुसरे दिवशीं उठला म्हणजे शिल्लक कमी कशी झाली हें पाहून त्याचें तो मोठें आश्चर्य मानीत असे. आतां कोणी चोरून नेली असें त्यानें मनांत आणावें

तर घरांत तो व त्याची मुलगी यांखेरीज दुसरें कोणी नसे. आणि असें असतां पेटींतील शिल्लक तर पुन्हां पुन्हां नाहींशी होई. पुढें त्याचेकडे कांहीं जरूरीचे काम तयार करण्या करतां आलें, यास्तव त्याने एक उमेदवार मदतीस ठेवला. नंतरहि शिल्लक कमी होण्याचा क्रम चाललाच होता. शेवटीं एक दिवस पाहतों तों पेटींत एक दमडी अथवा दुसरें कांहीं नाहीं. त्यावरून आपली मुलगी व उमेदवार अरजुदार या दोघांनीं मिळून चोरी केली केली असें त्याचे मनांत पक्के भरलें. त्यावरून मुलीस व उमेदवारास मोठ्यानें रागें भरून तो बोलला कीं आजपर्यंत थोडीथोडी चोरी तुम्ही चालविली होती. पण आतां तर सर्वस्वी मला तुम्ही लुटलें, हे माझ्यानें सोसवत नाहीं असें बोलून उभयतांस त्यानें कोतवालाकडेस पाठविलें. कोतवालाने पक्षकारांचा मजकूर ऐकून घेऊन दुसरे दिवशीं निर्णय करण्याचें ठरवून त्या दोघांस प्रतिबंधांत ठेवलें. जव्हाहिरी घरीं आला रात्रींला निद्रा येईना म्हणून त्यानें त्या दिवशी बरेंच मद्य प्राशन केलें. त्याचा अम्मल चढूं लागला तेव्हां शिसा हातांतून खालीं ठेवतांच पडून फुटला. मग तो तसाच निजला प्रातःकाळी उठल्यावर पाहतो तों एक पायाचे टाचेत कळ लागली आहे, पांघरूणास रक्त लागले आहे, पायांत निजतांना जोडे होते ते नाहींत व तळव्यास जखम झाली आहे. त्यानंतर तो उठून आंतल्या खोलींत गेला. तेथें पाहतो तों फुटलेले शिशाचा एक तुकडा पडला आहे व त्यापाशीं एक जोडा पडला आहे. तेव्हां मी रात्री झोपेचे व मद्याचे तारेंत येथें आलों असेन असें त्याजला वाटलें. इतक्यात फडताळाचें दार बरोबर बसलें नव्हतेसें पाहून त्यास त्यानें हात लाविला तों तें खालीं पडले व आंत हरवलेला पैका व दुसरा सर्व माल दृष्टीस पडला. तेव्हां मोठा विस्मय करून माझा मीच चोर असतां आपले पोरीस व उमेदवारास शिक्षा होण्याकरीतां मी कोतवालाचे स्वाधीन केलें, हा केवढा अन्याय आहे असें मनांत आणून त्यानें तत्काळ धांवत कोतवालाकडेस जाऊन त्या दोघांस सोडवून आणिलें. हा प्रमाणें निद्रेंतले निद्रेंत उठून भावनाप्रमाणें वर्तणूक करणारे लोक पुष्कळ असतात.

कोतवाल :—बोहराजीशेट, हा ग्रंथ आम्ही ठेवतों उदईक तुम्हांस पाहिजे तेथील हुंडी देऊं, नाहींतर रोख रुपये चुकवून देऊं.

त्यावरून बोहरी बरें आहे म्हणून त्या दिवशीं निघून गेला. आणि दुसरे दिवशीं कोतवालाचे घरीं पैका मागण्यास आला. तेव्हां चौकीदारानें सांगितले कीं आज कोणास वाड्यांत जाण्याची परवनगी नाहीं; उद्यां या. त्यावरून बोहऱ्यानें पांचपन्नास खेपा घातल्या; तरी कोतवालाचे दर्शन होईना. नंतर इलाज नाहींसा झाला असें पाहून कोतवाल याला रस्त्याने जातांना गांठून आपल्या ग्रंथाची किंमत अद्यापी हातीं आली नाहीं म्हणून तो बोलिला.


मनी वसे तें—

त्या गोष्टीचा कोतवालास राग येऊन त्यानें उत्तर केलें कीं तूर्त पन्नास रुपये द्यावे म्हणून आमचे कारभारी चिंतोपंत दादा याला सांगितलें आहे. त्यांकडेस जाऊन रुपये घ्यावे; पुढें बाकीचे रुपयांविषयीं सांगूं. नंतर बोहरी चिंतोबांकडेस गेला. त्याचीहि गांठ पडेना. तेव्हां त्याचे हाताखालील कारकून गोपाळपंत म्हणुन होता; त्याला व छडीदार राघोजी चव्हाण होता याला दाहा रुपये देऊं करून कारभाऱ्याची त्यानें भेट घेतली. तेव्हां दोन महिन्याचे वायद्यानें तुम्हांस चाळीस छापी रुपये देण्यास कोतवालसाहेब यांनी सांगितलें आहे. जर तुम्हांस घाई असेल तर आठ रुपये व्याजाबद्दल कापून देऊन बाकीचे बत्तीस रुपये घेऊन जा असें त्यानें सांगितलें. बोहऱ्यांनें निरुपाय होऊन छापी रुपये बत्तीस घेण्याचें कबूल केल्यावरून चिंतोपंतांनीं छापी रुपये ३२ देऊन ४० ची पावती मागितली; पण अशी पावती कशी देऊं म्हणून बोहरी म्हणूं लागला असतां जितके रुपये द्यावे त्यांचे सवाई लेख करून देण्याची सर्व सावकारींत चालच आहे; हें तुम्हास खरें वाटत नसल्यास जाऊन शोध करून घ्या. आणि मग सावकाश रुपये न्या; असें चिंतोपंत म्हणाला. ते समयीं एक गाठ पडण्यास इतके आयास, तेव्हां पुन्हां भेटण्याची गोष्ट कशाला पाहिजे? असा बोहऱ्यानें मनात विचार करून रुपये च्याळिसांची पावती निमूट लिहून दिली. इतक्यात त्या बत्तीस रुपयाचे रकमेपैकीं दहा रुपये गोपाळपंत व राघोजी चव्हाण यांनीं हिसकून घेतल्यावरून शंभर शिक्का रुपयाचे ऐवजीं बेवीस रुपये छापी हातीं आले व तेहि येण्यास महत प्रयास करावे लागले, हें पाहून बोहऱ्याचा जीव फारच संतापला आणि मी इग्रज सरकारचे लष्करातील राहाणारा आहे, माझी अशी अवस्था झाली हा मजकूर संगमावर जाऊन रेसिडेंट साहेब याला कळवितों व तुमची सर्वांची खबर घेववितों, अशी मोठ्यानें आरोळी करून 'इंग्रज सरकारचे रयतस लुटलें रे लुटलें' ह्या प्रमाणें ओरडतच तो तेथून निघाला. हा मजकूर घाशीराम यास कळतांच त्यांनीं आपला विश्वासुक मनुष्य पाठवून रेसिडेंट साहेब त्यांचे भालदार व चोपदार यांस नजर देऊं करून अमुक बाहेरी बंगल्यास येईल, त्याचा आंत प्रवेश होऊं देऊं नये असा बंदोबस्त राहण्याची तजवीज ठेविली. त्यामुळें बोहऱ्यास रेसिडेंट साहेबांची गांठ पडेना असें झालें. त्यासमयीं तोफेची इंग्रजी दारू परवानगीशिवाय इंग्रजसरकारचे लष्करांतून पुणें शहरांत कोणी विकण्यास नेऊं नये असा कायदा होता. त्याची माहिती बोहरी याला होती. त्याजवरून त्यानें दारू घालण्याच्या जशा पिशव्या असतात, तशा तयार करून त्यांत वाळू भरून, त्या पिशव्या एका पेटींत बंद करून त्या पेटीवर खादी जडून तीवर आपले नांव व मुक्काम लष्कर नजीक संगम असें लिहून तयार केली; व घाशीराम याची एक राख




होती तिचे घरीं अस्तमानाचे संधीस जाऊन सांगितलें कीं त्या पेटींत इंग्रजी दारू आहे तिची किंमत शहरांत फार चांगली येते, शहरांत अशी दारू आणण्याची परवानगी नाहीं, असें असतां मी चोरून येथें ती आणविली आहे. ती आजची रात्र आपले घरीं पलंगाखालीं दडवून ठेवावी, मी उदयीक पहाटेस येऊन घेऊन जाईन; मी आपले उपकार विसरणार नाहीं. ही गोष्ट कोणास सांगाल तर प्रभूचे पायाची शपथ आहे. मी आतां इंग्रज सरकारचे लष्करांत आपले घरीं जातो. असें सांगून तो घरीं गेला. दोन प्रहर रात्र झाल्यावर घाशीराम नित्याप्रमाणें राखेच्या घरीं आले. तिनें दुसरीं सर्व कामें सोडून प्रथम बोहऱ्यानें दारूची पेटी आपले घरी लपवून ठेविल्याचा मजकूर सर्व त्यास सांगितला. त्याजवरून कोतवाल यानीं पेटी तपासून पाहिली तो तिजवर ज्या मनुष्यापासून इंग्रजी ग्रंथ घेतला होता त्याचेंच नांव आहे असें कळलें. त्यावरून 'बरा सांपडला, ह्याची आतां खोड मोडतों.' असें बोलून ती पेटी त्यानें पाहाण्यांत ठेवली.

प्रातःकाळ होतांच पेटी घेऊन रेसिडेंट साहेबाकडेस तो स्वतः गेला आणि इंग्रज सरकारचे लष्करांतील अमुक बोहऱ्यानें ही इंग्रजी दारूची पेटी चोरून शहरांत नेलेली होती. तो मनुष्य फारच लबाड असल्याचा आम्हास अनुभव आहे. या बोहऱ्यानेंच आम्हास चाळीस रुपयांस लहानसा ग्रंथ विकत दिला, त्या प्रमाणें त्याजला रुपये देऊन आमचे कारभाऱ्यानें पावती लिहून घेतली असतां आमची व आमचे पदरचे लोकांची खोटी नालस्ती चोहोंकडे सांगत तो फिरत असतो; असें तो बोलल्यावर रेसिडेंटने चपराशास हांक मारून बोहऱ्यास बोलाऊं पाठविले; आणि तो आल्यावर घाशीरामाचे समक्ष ही पेटी कोणाची आहे असें त्यास विचारिलें. तेव्हां माझी आहे, ती कोतवालसाहेब यांच्या राखेकडेस काल संध्याकाळीं मी ठेविली असें त्यानें उत्तर केलें. त्या नंतर रेसिडेंट साहेब यांनी हतोडा आणून पेटी फोडली. आणि तींतील थैल्या बाहेर काढून फोडील्या तों त्या थैल्यांतून वाळू निघाली. तें पाहून रेसिडेंट साहेब व कोतवाल ह्यांचा मोठा घोटाळा झाला. मग रेसिडेंट साहेब

[ पान ४३ वर ]











**श्री. दिलीप रा. सप्रे**, विलेपार्ले

**प्रश्न : पं. नेहरू, चव्हाण आदि कॉंग्रेस नेते निवडणुकींत पडले तर काय होईल ?**

**उत्तर :** पं. नेहरू, चव्हाण आदि नेते निवडणुकीत पडले तर निवडून येतील व 'पडले' तरी त्यांना निवडून आणण्यांत येईल.

**प्रश्न : ह्या चराचर सृष्टीचा निर्माता जर ब्रह्मदेव तर ब्रह्मदेवास कोणी निर्माण केलें ?**

**उत्तर :** शेषशायी भगवानाच्या नाभिकमलांतून ब्रह्मदेवाची उत्पत्ति झाली.

**प्रश्न : चंद्रावर अमेरिकन आणि रशियन माणसें एकाचवेळीं पोहोंचली तर त्यांचे संबंध कसे राहतील ?**

**उत्तर :** आदिमानवासारखे —

**प्रश्न : सर्व राजकिय पक्ष नेहमीं सत्य बोलूं लागले तर कोणता पक्ष प्रबळ ठरेल ? व राज्यारूढ होईल ?**

**उत्तर :** ज्याचें सत्य खरें ठरेल तो !

**प्रश्न : अष्टग्रही-शांती-यज्ञांमुळें अष्टग्रहीचा संभाव्य धोका टळला हें कितपत खरें आहे ?**

**उत्तर :** आगामी अंदाजपत्रकें मांडली गेल्यानंतरच धोका टळला कीं नाहीं तें सांगतां येईल.

**श्री. हरी पंढरीनाथ माणीकराव**, बडूर

**प्रश्न : अमृतापेक्षां विषाची किंमत जास्त वाटते तें खरें का ?**

**उत्तर :** होय. कारण विष घेतल्यानंतरच स्वर्गांत अमृताची प्राप्ती होते म्हणून.

**प्रश्न : वाईट लिहिण्यापेक्षां वाईट बोलणें चांगलें का ? तसें लिहिलें तर दोश मला कि माझ्या लेखणींला !**

**उत्तर :** तुमच्या सदोष शिक्षणाला !

**श्री. यशवंत वामन काळे**, उरण

**प्रश्न : शिक्षा कोणती बरी-फांशी कीं जन्मठेप ?**

**उत्तर :** अशिलाच्या दृष्टीनें फांशी, वकीलाच्या दृष्टीनें जन्मठेप.

**श्री वि. के. फडके**, नाशिक

**प्रश्न : उत्कृष्ट सवालाबद्दल संपादक वाचकांना पांच रुपये पारितोषिक देतात तसेंच उत्कृष्ट उत्तराबद्दल तुम्हालाहि देतात काय ?**

**उत्तर :** संपादकांनी ते काम तुमच्यासारख्या रसिक वाचकांवर सोपविले आहे. आपल्या मनिऑर्डरची मी वाट पहात आहे.

**प्रश्न : पंडित नेहरूं राजकारणांत न पडतां चित्रपट व्यवसायांत पडले असते तर ?**

**उत्तर :** पृथ्वीराजासारखे राज्यसभेत नियुक्त झाले असते, अशोक कुमारसारखी त्यांना 'पद्मश्री' मिळाली असती, धर्मार्थ क्रिकेट सामन्याचे ते प्रमुख आकर्षण ठरले असते, व कॉंग्रेसच्या निवडणूक प्रचारासाठीं त्यांच्या कलापथकानें उत्कृष्ट सेवा केल्याबद्दल त्यांना प्रथम महाराष्ट्र सांस्कृतिक खात्याचे उपमंत्रीपद मिळालें असतें. व नंतर भारतीय नभोवाणी आणि प्रचारखात्याचें मंत्रीपद प्राप्त झालें असतें.

**प्रश्न : तुम्ही मोरारजी देसाई असतां तर नवीन सालांत कोणते कर बसविले असते ?**

**उत्तर :** केस कर.

**प्रश्न : आचार्य अत्रे यांना मुंबईचे मुख्यमंत्री केल्यास ते सर्व प्रथम कोणती गोष्ट करतील ?**

**उत्तर :** 'मराठा' चें सरकारी गॅझेट करतील.

**श्री. विष्णु परब**, भायखळा

**प्रश्न : स्वामी विवेकानंद आज हयात असते तर त्यांनीं निवडणुकींत कोणाचा प्रचार केला असता ?**

**उत्तर :** हिंदुमहासभेचा.

**प्रश्न : नवचित्रकार कसा ओळखावा?**

**उत्तर :** त्याच्या डोळ्यांतल्या उलट्या बाहुल्यांवरून.

**श्री. रमेशकुमार घुलघुले**, नागपूर

**प्रश्न : काल भेट आज गाढ (व) प्रेम, उद्यां लग्न अशा दैनिक प्रेम प्रकारांत परवां काय होण्याची शक्यता आहे ?**

**उत्तर :** घटस्फोट.

---

वाचकांना अडलेल्या चमत्कारिक प्रश्नांना उत्स्फूर्त उत्तरें देण्यासाठीं प्रस्तुत सदराची योजना सुरू होत आहे. मराठी साहित्यांतले एक अष्टपैलू लेखक वाचकांकडून येणाऱ्या प्रश्नांस उत्तर देण्यास सिद्ध झाहले आहेत. मात्र ह्या शरसंधानामुळें वर्मी घाव बसल्यास त्याचें पाप माथीं नको म्हणून तूर्त अनामिक अवस्थेंतच त्यांनी हें कार्य पत्करलें आहे. वाचकांनीं आपले सुबोध प्रश्न सुवाच्य अक्षरांत लिहून पाठवावे. अर्वाच्य प्रश्नांना उत्तरें दिलीं जाणार नाहींत.

---

**श्री. उमेश स. बागायतकर**, मालाड

**प्रश्न : आजच्या तरुणींना नवरा व नखरा यांच्यात अधिक प्रिय कोण असतें ?**

**उत्तर :** ह्या दोहोंपेक्षां लोकांच्या नजरा.

**श्री. श्रीराम ज. कानोले**, कल्याण

**प्रश्न : निवडणुकींत पडलेल्या पक्षांनीं काय करावें ?**

**उत्तर :** स्वस्थ करीत स्वस्थ राहावें.










**प्रश्न : मला गोवें पहाण्याची फार इच्छा आहे—**

**उत्तर :** –आतां गोव्यांत पहाण्यासारखें कांहींच उरलेलें नाहीं.

**प्रश्न : शब्दकोडीं हा एक श्रेष्ठ बौद्धिक छंद नाहीं काय ?**

**उत्तर :** छे, छे ! तो एक कनिष्ट निर्बुद्ध जुगार आहे !

**श्री. यशवंत ना. भावे,** डोंबिवली

**प्रश्न : द्विभार्या प्रतिबंधक कायदा करण्याचें कारण काय ?**

**उत्तर :** बिचाऱ्या नवऱ्यांना रक्षण मिळावें म्हणून.

**प्रश्न : मराठी नाटक थिटें कां झालें ?**

**उत्तर :** पोलिस कमिशनरच्या कालमर्यादेच्या कायद्यामुळें !

**प्रश्न : शीत युद्ध म्हणजे काय ?**

**उत्तर :** भुतांच्या युद्धाला शीतयुद्ध असे म्हणतात.

**कु. अरुणा देशपांडे, कुर्ला**

**प्रश्न : जाहिरातींतील व्यक्ति नेहमीं हंसत असतांना कां आढळतात ?**

**उत्तर :** आकर्षक जाहिरातीनें फसून माल विकत घेतल्यावर पस्तावणाऱ्या गिऱ्हाईकांच्या मूर्खपणाची जाणीव होऊन त्यांना हंसे येत असतें.

**प्रश्न : मनुष्याला टक्कल केव्हां पडते ?**

**उत्तर :** केशाकर्षण कमी होऊं लागल्यावर.

**प्रश्न : जग ही रंगभूमि मानली तर संसार म्हणजे काय ?**

**उत्तर :** संसार ही सर्कस असून ती एकखांबी तंबूत खेळ करीत असते. नवरा हा तारेवर कसरत करणारा कसबी कलाकार असून पत्नी ही रिंगमास्टर असते. मुलेंबाळें ही कधींकधीं माकडें बनतात तर कधीं कधीं बँडबाजा वाजवतात. पाहुणे, शेजारी अथवा मित्र हे ह्या सर्कसचे फुकटांत प्रयोग पाहणारे प्रेक्षक असतात.

**विद्याधर सदाशिव वडगुजर,** कल्याण

**प्रश्न : मला पोट दुखीचा जुनाट विकार आहे. अनेक औषधें केलीं पण गुण नाहीं. अशा स्थितींत मी काय करूं ?**

**उत्तर :** दुसऱ्यांचें भलें बघायला शिका !

**बंडू कोठावळे,** राघववाडी

**प्रश्न : मामा वरेरकरी पद्धतीची एक कोटी करून दाखवा.**

**उत्तर :** तुम्हीं 'एस. के. पाटील इन् जपान' हा सिनेमा पाहिला काय ?

**नंदू भडसावळे,** हाजी कासमवाडी

**प्रश्न : मामा वरेरकरी पद्धतीची एक थाप मारून दाखवा.**

**उत्तर :** सध्यां मी पं. नेहरूंच्या आत्मचरित्राचा दुसरा भाग लिहित आहे.

**प्रश्न : आणखी एक.**

**उत्तर :** हरलों !

**एस्. जे. माइणकर,** उंबरगांव

**प्रश्न : गेलीं कित्येक वर्षं मी सकाळीं फिरावयास जात जाईन म्हणतोय्. पण पहाटें डोळ्यावर इतकी झोंप असते कीं उठवतच नाहीं. यावर कांहीं उपाय आहे काय ?**

**उत्तर :** झोंपेंत चालण्याची संवय करा.

**काशीनाथ ना. धोपटे**

**प्रश्न : मला लेखक व्हावयाची इच्छा आहे. पण अनेकदां प्रयत्न करूनहि कांहीं जमत नाहीं. काय करावें ?**

**उत्तर :** योगाभ्यास करावा. गीता वाचावी. म्हणजे मनांत ज्या भलभलत्या इच्छा डोकावतात त्यावर विजय मिळविणें सोपें जाईल. लेखक होऊन आजवर कुणाचेंहि भलें झालेलें नाही हेंहि वाक्य लक्षांत ठेवावें.

**तुकाराम चाबुकस्वार,** चेंदणी

**प्रश्न : मराठींतील सर्वात वैशिष्ट्यपूर्ण मासिक कोणतें ?**

**उत्तर :** जें कोणत्याहि निमित्तानें विशेषांक काढीत नाहीं तें !

**पां. द. छत्रे**

**प्रश्न : आम्ही गंभीर प्रश्न विचारतों आणि तुम्हीं त्यांचीं विनोदी उत्तरें देतां याचा अर्थ काय ?**

**उत्तर :** कृपा करून असले विनोदी प्रश्न विचारूं नका बुवा !

**विश्वास देशकुळकर्णी,** राजापूर

**प्रश्न : चांगला घरमालक कोण ?**

**उत्तर :** भाडेकरूला घर जांवई करून घेतो तो !

**प्रभाकर कोल्हटकर,** सांगली

**प्रश्न : शिवाजी पुन्हां माधवाश्रमांत आला तर काय होईल ?**

**उत्तर :** त्याला माधवश्रमांत जागाच मिळणार नाहीं ! शिवाजी झाला म्हणून काय झालं !......

**मालिनी मंगेश नेरूरकर,** बांदा

**प्रश्न : सगळ्या मराठी मासिकांच्या संपादकांनीं यंदा दिवाळी अंकच काढावयाचे नाहींत असें ठरविलें तर काय आपत्ति ओढवेल ?**

**उत्तर :** रद्दीवाले बिचारे बुडतील !

●●●

---

(पान ४१ वरून)

यांनी हें तरकट करण्याचे कारण काय असे बोहऱ्यास विचारिलें. तेव्हां बोहऱ्यानें बावीस रुपये छापी रेसिडेंट साहेबापुढें ठेवून, एकशें शिक्का रुपयांस ग्रंथ कोतवाल यांनीं सही केली असतां, अंती माझे हातीं बावीस रुपये छापी दिले; त्यांत पांच रुपये निवळ तांब्याचे व दाहा मुलाखाचे व सात चांगले आहेत. मी साहेबाकडेस फिर्याद देईन म्हणून साहेबांचे बंगल्याकडील लोकांस लांच देऊं करून माझा साहेबांकडेस प्रवेश न होईलं असा बंदोबस्त कोतवालानीं ठेविला आहे. त्यामुळें आज सहा महिने झाले मी रोजगार सोडून फिरत आहे, तरी माझी दाद कोठेंच लागेना. सबब साहेबाकडेस येण्याकरितां ही युक्ती केली आहे. असें त्यानें उत्तर केलें आहे. त्यावरून रेसिडेंट साहेब फार नाखुष झाले आणि ह्या बोहऱ्याची फारकती चार घटकेच्या आंत न आली तर मुंबई सरकारास लिहून तिकडून श्रीमंत सरकारास यादी लिहिण्याचे करूं. ह्या, प्रमाणें घाशीरामाला सांगून त्यास विडा पान न देतां निरोप दिला. नंतर घाशीरामानें सत्वर घरीं येऊन शंभर रुपये शिक्का रेसिडेंट साहेबाकडेस पाठवून आपण त्याची हवी तशी पावती द्यावी म्हणून निरोप पाठविला. त्यावरून रेसिडेट साहेबांनीं बोहऱ्यास बोलावून रुपये त्याजला देऊन छापी रुपयांपैकीं पांच खोटे रूपये नदींत फेकून देऊन बाकी रुपये पंधरा नुकसानीबद्दल त्या बोहऱ्यास देऊन फारकत घेतली.

●●●

# वॉंटेड 'नायिका'

- रंगनाथ कुलकर्णी



### दृश्य १ लें

कॅमेरा मुंबईच्या चौपाटीच्या गर्दीच्या दृश्यावर स्थिरावतो. फिकट निळें आकाश, शुभ्र-निळें फेसाळ पाणी. रंगीबेरंगी गर्दी. पण मार्केट छोटं असल्यानं पिक्चर 'ब्लॅक ॲंड व्हाईट' मध्येंच 'शूट' करायचं निर्मात्यानं ठरवल्यानं सारं कांहीं आपल्याला कमी अधिक काळं-पांढरं दिसतं-खांब अन् माणूस यांतला फरक जाणवतो अन् स्त्री-पुरुषहि वेगळे भासतात. आकाश-गर्दी, अथांग सागर-गर्दी या क्रमानं चार पांच वेळां कॅमेरा फिरतो. मग एकदां टिळक-पुतळ्याचा 'क्लोज अप'-मुंबई-चौपाटी अशा रीतीनें प्रेक्षकांच्या मनावर 'एस्टॅब्लिश' केल्यानंतर कॅमेरा एका शेटजी-शेटाणीच्या अगडबंब जोडप्यावर स्थिरावतो.

शेटजी : ( चिडून ) अग मंग आखरीला तमे काय पायजे ?

शेटाणी : ( रुसून ) भेळ पायजे-पाणी-पुरी पायजे.

कॅमेरा हलतो अन् एका भकास चेहऱ्याच्या महाराष्ट्रीय तरुणाच्या चेहऱ्यावर विसावतो. क्लोज-अप्-डोळ्यांत मराठी तेज, मराठी बाणा ! अर्थात खिसा खालीं ! ! शेजारी त्याच्यापेक्षां किंचित् बऱ्या स्थितींतला त्याचा मित्र.

दुसरा तरुण : ( पहिल्याला ) मग मीं काय करावं म्हणतोस ?—तुला पाहिजे तरी काय ?

प. तरुण : ( वैतागानं ) मला नोकरी पाहिजे नोकरी !—

चंचल लक्ष्मीप्रमाणें कॅमेरा पुन्हां हालतो. चारपांच पांढरपेशा सुखवस्तूंचा घोळका. त्यांतील बाई ऐसपैस. घोळक्यांत एक लुकडा चष्मेवाला तरुण. स्कॉलर वाटावा. हास्य-कल्लोळ. शेजारी 'नारियलवाला' पानी ?—कोत्रा ?

वयस्कर सुखवस्तुः- ( फिसकारून ) छट् ! इथं 'कोब्रा' नाहीं कुणी !—सारे कायस्थ आहोंत आम्ही—कायस्थ—

नारियलवाल्याखेरीज बाकी सगळेजण खीः खीः खीः करून हंसतात.

ऐसपैस बाई : मग मध्या, आतां तुला क्लास मिळाला—जॉब मिळाला—आतां आणखी काय हवंय तुला ?—

वय० सुख० : छोकरी ! खीः खीः खीः ! आतां त्याला एक फक्कडशी छोकरी पाहिजे ! होः होः होः होः होः ! ! !

कॅमेरा पस्तिशीच्या आसपास रेंगाळणाऱ्या दोघा व्यक्तींपाशीं थांबतो. पहिला 'क्लोज अप्'-दाढी वाढलेली, केंस पिंजारलेले—डोळे तांबारलेले, हातांत विडी-कपडे गबाळे... दुसरा 'क्लोज अप्'—ऐटबाज कपड्यांतला गुळगुळीत घोटीव तरुण—इवाईमन बुश शर्ट, फाय फाय फाय—वगैरे वगैरे.

*वाङमय–फौजदारांना जाहीर आवाहन ( कीं, आव्हान )– या लिखाणावर कोणत्या अमेरिकन, इटालियन, कोरियन, फिजीयन, कंबोडियन, घानाइयन वगैरे वगैरे–श्रेष्ठ लेखकाची छाप आहे त्याचा सुगावा, हें लिखाण प्रसिद्ध झाल्यापासून– एक वर्षाच्या आंत लावून देणारास संपूर्ण मोबदला मेहनताना म्हणून देण्यांत येईल हो sss !*

**–लेखक**

---

**ऐटबाज :** नाम्या, तें पटलं !--आपलं हें नाटक अगदीं 'बॅंग' करून जाणार ! लागोपाठ दोनशें खेळ ठोकतों ! तूं बघत रहा.

**गबाळा :** ( आवंढा गिळून ) शन्या, बघतो रे. पण--पण नायिका पाहिजे.

**शन्या :** ( नाम्याच्या पाठीवर सणसणीत थाप मारून ) नायिका पाहिजे म्हणजे काय ! फॅ फॅ फॅ -अगदीं फक्कड पाहिजे.

**नाम्या :** ( डोकें खाजवीत ) तशी फक्कड नसली तरी चालेल कारण दोघींतलीं नायिका जरा 'डावीच' असते.

**शन्या :** तें कळलं रे. मी ॲक्टिंग टॅलंटबद्दल बोलत होतों.

**नाम्या :** ( हुषारून ) मग हरकत नाहीं. ( पुन्हां चेहरा रडवा ) पण शन्या, आहे कां रे तशी एकादी !

**शन्या :** एकादी ! छप्पन्न हजार पोरी उभ्या करतो बघ तुझ्यापुढं–तूं नुसत्या नापास करायच्या लायनीनं—नाक चांगलं नाहीं, चालतां येत नाहीं, फेस्–कट नाहीं, क्लोज अप् ए वन येणार नाहीं, रंग हवा तेवढा गव्हाळी नाहीं–बेंगॉली ब्राऊन वाटतो...

**ना० :** ( थांबवीत ) अरे, अरे शन्या–माझं लग्न व्हायच्या आधीं कां नाहीं रे तुझी माझी गांठ पडली !

**श० :** ( व्हिलनिक लाफ्टर )–इथं एक मस्तपैकीं उर्दू शेर टाकायला सांगायचं–पगडी किंवा गोखल्यांना–( भावांत जमायला हवं. ) शेराचा भावार्थ असा:–ज्या त्या वेळीं ज्या त्या माणसांच्या गांठी पडल्या असत्या तर जीवनांत आज अनपेक्षित, अद्‌भुताची जी लज्जत आहे ती उरलीच नसती...

**ना० :** ( उर्दू रसिकाच्या थाटांत ) वाह् भाई वाह् ! क्या फर्माया.

**श० :** ( उर्दू शायराच्या थाटांत ) रहे नाम–

नाम्या आणि शन्या एकसाथ खिशांत हात घालतात, एकसाथ बाहेर काढतात, नाम्या हातांतली विडी तोंडात ठेवतांच शन्या काडी शिलगावून ती प्रज्वलित करतो. ( इथं दोघांच्या ॲक्शन्सची सिमिट्री साधली पाहिजे, ॲक्शन इतकी क्विक झाली पाहिजे अन् एवढी इम्प्रेसिव्ह अन् इफेक्टिव्ह दाखवली पाहिजे कीं, तो मॉंटाज् वाटावा–जाणकारांना नाम्या व शन्या दोघे मिळून एक दिलानें कलेच्या सेवेला आयुष्य वहाणार या अव्यक्त, अनुच्चारित प्रतिज्ञेचा–त्यांच्या समग्र भावी कला जीवनाचा ! त्याच्या अखिल कलापूर्ण भावविश्वाचा !! )

**ना. :** ( चेहरा रडवा ) जगांत पुष्कळ नायिका आहेत रे– पण आपल्याला मिळेल का त्यांतली एकादी !

**श. :** ( नाटकी आगा ) मघाशीं सांगितलं ना–माझ्यावर कुणी डिसबिलीफ दाखवलेला–आय डोण्ट लाइक ॲट ऑल– म्हणजे साफ नापसंत आहे ही वृत्ति मला—

**ना. :** (शरणागति पत्करून) तसं नाहीं रे– पण मग सुरुवात कुठं करायची, असं विचारीत होतों मी—

**श. :** ( कविकल्पना सुचावी तद्वत् )... काय रे नाम्या, तुला ती निरु आठल्ये आठवते ! —घारे घारे डोळे...बायकी चाल... रुंद चेहरा...हंसरे डोळे...

**ना. :** ( आंबट चेहरा )— पण मी रंगवलेली नायिका तर दुःखानं होरपळलेल्या स्त्रीजातीची प्रतिनिधिक शोकमूर्ति आ—

**श. :** ( वाद घालण्याच्या तयारींत ) मग तुझं काय म्हणणं आहे— मूळचा चेहरा हंसरा असलेल्या तरुणीला रडतांच येत नाहीं ! ( समजावीत ) सुंदर तरुणी रडली तर प्रेक्षकांच्या अंतःकरणाला घरं पडतात घरं— एवढालीं–त्यांतनंच मग पैसे निघून थेट त्यांच्या खिशांतनं आपल्या खिशांत येतात– याला म्हणतात रिपीट व्हॅल्यू—याचंच दुसरं नांव सेक्स अपील—कळलं !–हाच बॅंग... ( दोन बोटं नाचवीत ) दोनशें खेळ लावतों. बघ तुझ्या नाटकाचे लागोपाट–मुंबई–पुणें, मुंबई–पुणें, मुंबई–कोल्हापूर, मुंबई–नागपूर, मुंबई, मुंबई, मुंबई, मुंबई–बस्स मग बॉम्बे एके बॉंबे !–

**ना० :** त्याच बॉम्बेंतल्या एखाद्या तरुणीला नायिका करण्यासाठीं जायचंय आपल्याला— निरू आठल्ये कोण रे ही !–

**श० :** तुला नाही माहित. आमच्या बरोबर होती लॉ–ला. आतां बसलीय् लग्न करून मुलं सांभाळीत.

**ना० :** बाप रे–मग ती आतां आपल्याला ॲव्हेलेबल–!–

**श० :** अलबत्–! साठे नांवाचा कुणी केमिस्ट आहे. मोठ्या हुद्यावर आहे कुठल्या तरी फॉरेन फर्ममध्यें–( अर्थपूर्ण हंसून ) मला ती कधींच नाहीं म्हणायची नाहीं.

**ना० :** मग कधीं जाऊं या– उद्यां !–

**श० :** ( आपल्याच नादांत ) आमचे रिलेशन्स आहेतच मुळीं क्लोज पहिल्यापासून– ( भानावर येऊन ) नाहीं, नाहीं, उद्यां नको– नाहीं म्हणजे असं करतो–मी उद्यां साठ्यांना फोन करतों. त्यांची अपॉइंटमेंट घेतो. मग जाऊ मिळूनच. अशी झक्कास इंट्रोडक्शन करून देतो तुझी कीं, वरळीच्या नाक्यावर कधीं 'बस'ला थांबलास तर झपकन लिफ्ट दिला पाहिजे त्यानीं तुला.–काय ए वन् ॲम्बॅसॅडर घेतलीय बेट्यानं यंदा नुकतीच–

**ना० :** त्यांच्यापेक्षां तुझी ती निरू लिफ्ट देतेय कां पहा —

**श० :** भले भले–लेखक शोभतोस खरा– आतां तूं जिथं बापजन्मांत पोंचणार नाहींस अशा एकाद्या सर्कलमध्यें खपवतो ही जोक माझी म्हणून—

**ना० :** मग निरू आठल्येचं ठरलं !

**श० :** अगदीं पक्कं !

**ना० :** तिचा होकार आला कीं, एन्ट्री भरायची कॉम्पिटिशनची—

**श० :** बेशक–सगळीं प्राइजेस 'बॅंग' करून टाकू बघ यंदा आपण—

**ना० :** ( प्रश्नार्थी चेहरा )

* * *

## दृश्य २ रें

दैनिक "टिमकी" ची कचेरी. उपसंपादकाच्या आसनावर कार्यव्यग्र नाम्या. त्याचे दोन चार सहकारी कमी अधिक टार्गटीचे

एक थेरडा– हेडक्लार्क असावा. दैनिक पत्राच्या कचेरीची धामधूम– 'रात्रंदिन आम्हां युद्धाचा प्रसंग' या थाटाची– टिपून कॅमेरा नाम्याचा एक सहकारी एक पेपर वाचतोय त्या पेपरवर स्थिरावतो– बातमीचा क्लोजअप-यंदाच्या नाट्यस्पर्धा – प्रवेशपत्रिका भरण्याची अखेरची तारीख – २० ऑगस्ट – कॅमेरा कॅलेंडर टिपतो. १६ ऑगस्ट– पेपर वाचणाऱ्या सहकाऱ्याचा खोकड – चेहरा— क्लोजअप--

**एक सह.** : खीः खीः खीः—काय नाम्बा–

**हेडक्लार्क :** हे पहा एर्वते, त्यांना नाम्बा म्हणूं नका– आतां ते नाटककार झालेत—

**ए. स.** : म्हणूनच म्हटलं कीं, यंदा कर्तव्य आहे कीं नाहीं नाम्बांना !

**सामुदायिक :** हीः हीः हीः होः होः होः—

'टिमकी' चें सांखळी-पत्र 'दि ड्रम' मधून बरजोर पारडीवाला बोंबलतो– "ए साला पर्वते – काय झाला रे लुमुम्बाचा ?,'

**प.** : मेला तो, !!!

(सामुदायिक हंशाची टेप पुन्हां वाजविणें.)

**ब. पा.** : मंग आज काय त्येचा ?

**प.** : त्येचा धाकटा भाई ये नाम्बा आया है इधर--

**ब. पा.** काय साला खालीपिली बकवास करता रे तू पर्वत-पे-अपना डेरा !--

(एकटा नाम्या हंसतो)

ड्रामा लिखतो तर लिखूं दे ना साला त्येला पीसफुली—

**हेडक्लार्क :** लिखाच काय उवा पण द्यायला तयार आहोंत म्हटलं आम्ही-- (स्वतःच हंसतो)

**ब. पा.** : (नाम्याला) आवंदा काय एन्ट्री बिन्ट्री भरली का नाय ?

**ना.** : (चेहरा वेदान्ती)

**ब. पा.** काय डिफिकल्टी असेल तर सांग साला.

**ना.** : (घाईघाईनं बर. ला टेलिप्रिंटर पाशीं ओढीत नेतो)--साली हिरॉइन मिलती नहीं अच्छी--

**ब. पा.** : पारशी चालेल ? नाहींतर अँग्लो-इंडियन ?--

**ना.** : (चेहरा खेटर मारल्यासारखा)—

**ब. पा.** : (हंसतो) सगळा ड्रामा री-राईट कर–नी डझनभर पारशी पोरी देतो—

(सगळ्यांच्या हंसण्याची टेप)

(फोन वाजतो. हेडक्लार्क घेतो.)

**हेड.** : हॅलो, हो – हो नाटककार ना ! आहेत – आहेत–देतो, देतो !--अहो नाटककार हिरॉइन आलीय–फोन मधनं घ्या

**ना.** : (फोनवर) हो, हो अच्छा, अच्छा मालाड – एक नंबर–घड्याळाखालीं–बरं-बरं पावणे नऊ– अगदीं ! त्याची काळजी नको हाः हाः हाः ! करतां काय ? बरं–(फोन ठेवतो)-- (शरणागताची लकेर मारतो) (हेडक्लार्क खालीं गेलेला पाहून)— खेळ लागल्यावर तूं पास माग वेट्या, मग दाखवतो अंगठा–आतां तेवढं निरुनं 'हो' म्हटलं म्हणजे सगळं जमलं—

(या सबंध दृश्याला दैनिक पत्रांतील टेलिप्रिंटरची अखंड "टिक टिक – कट – कट कट कट" हें पार्श्वसंगीतासारखं वापरून जागतिक विक्रम करणारा सिम्बॉल टाकणें मानवी जीवनांतला एक प्रकारचा "तोच तो पणा" व्यक्त करणारा सिम्बॉल–"काकूपासून ताज महाल"–हें समूह–गीत पलिकडच्या किनाऱ्यावर कोळ्याच्या तोंडी घालायला लेखकांचं ऑब्जेक्शन नाहीं. फक्त मूळ कवि थोकांडीं बसणार नाहीं याची खबरदारी घेऊन वेळीचं बारके बारके बदल करणें इष्ट–कारण मूळ फारच धष्टपुष्ट असल्याचं ऐकतो)

× × ×

## दृश्य तिसरें

पश्चिम रेल्वेवरील मालाड स्टेशनचा एक नंबरचा प्लॅटफॉर्म. त्या प्लॅटफॉर्मवरचं घड्याळ त्या घड्याळाचे कांटे पावणे नवावर पोंचलेले झट झट कॅमेरा फिरतोय. कथानक किती वेगानं पुढं चाललंय– नायिकेच्या दिशेनं– त्याचं प्रतीक ! नाम्या शन्या भेटतात. राम-भरता सारखे ! पौराणिक दाखला– 'अनदर बॅंग ! "मासेस' ना अपील करायचं तर दोन्ही गोष्टींना हात घातलाच पाहिजे एक 'सेक्स'- अन् दुसरी 'मायथॉलॉजी !' --

रस्ता, लांबच लांब–मॉंटाज–कलावंताला केवढी वाटचाल करावी लागते त्याचं प्रतीक ! शन्या – नाम्या मात्र स्टेशन बाहेर येतांच शन्या प्रणयिनीसारखा नाम्याला काखोटीला मारून ऐटींत टॅक्सी थांबवतो–आतां शन्याचा पोषाख म्हणजे सैल पायजमा – झब्बा झुलुपकुमार छाप झुलुपें कंगव्यानं पसरवून ठेवलेलीं. कवि वाटावा ! डोळ्यांत रसिकता ओतप्रोत कीं कायशी भरलेली--

टॅक्सीचं मीटर गरगर आंकडे पुढं ढकलूं लागतं– कॅमेरा आळीपाळीनं मीटर वर आणि नाम्याच्या चेहऱ्यावर थांबतो– ! शन्यानं भाडं दिलं नाहीं तर आपली धडगत नाहीं' ह्या नाम्याच्या अभिप्रायाकडे शन्या सराईत दुर्लक्ष–तो आपल्याच मस्तींत धुंद—

**ना.** : (भीत भीत) काय म्हणाले रे साठे ?

**श.** : (शराबी सूर) कुछ नाहीं मेरे लाल, सब ठीक हो जायगा—हम है ना ?

**ना.** : (इथं नायिकेच्या कामासाठीं शन्याचा उपयोग नाहीं-- ही व्यावहारिक अडचण खुपून तोंड आंबट)—

टॅक्सी एका अलिशान बंगल्याच्या पोर्चंमध्यें थांबते. शन्या फसकन् पांचाची नोट पुढे करतो. तोंच बंगल्याच्या पायऱ्यांवर एक एक जाडशी, काळी असावी बहुधा, पण कुरुप वाटावी इतपत–एक दांत वांकडा–चेहरा मात्र हंसरा, गोल, गोड, बोलका अशी तरुणी !

**तरुणी :** अय्या शरद !—

**श.** : हो निरु मी आलोंय—(आलों तुझ्याच दारीं' या थाटांत एक पाय वरच्या पायरीवर एक खालीं. चेहऱ्यावर अशोककुमार छाप भाव. पंचवीस वर्षांत किंचितहि न बदललेले प्रणय व्याकुळ !) (नाम्या. टॅक्सीपाशी अवघडून उभा)

**त.** : प्रभा म्हणाला, शिरोडकर भेटायला येणार आहेत तुला, तेव्हां कळलंच नाहीं मला तूं होय !–' अरे मग नुसतं शरद नाहीं का सांगायचं.

**श.** : सांगितलं. मी शरद असंच सांगितलं पण ही प्रभा कोण ?

**त.** : (हंसते) मिस्टर माझे—

**श.** : त्यांनीच खेंकसून विचारलं–शरद कोण ? मी म्हटलं, शिरोडकर ! शरद शिरोडकर ! म्हणजे त्यांनी तुला फक्त फिफ्टी पर्सेंट नांव सांगितलं म्हणतेस ?

**त.** : म्हणून तर—मला कळेना–मी जाणा होतें.

**श.** : कसं काय चाललंय तुसं निरु आर यू हॅपी ?—

दोघं दिवाणखान्यांत येतात. नाम्या बाहेरच्या व्हिजिटिंग रुममध्यें एका कोपऱ्यांत एका–खोलींत अवघडून टेकतो.

अनुक्रमणिका

नि. : ॲब्सोल्यूटली ! काय कमी आहे मला ?–बंगला, कार– बाबा आहे आठ महिन्यांचा—

श. : (आवंढा गिळून) कॅांग्रॅटस !–मला कल्पना–नव्हती—

नि. : (हंसते) कल्पना काय असायची ? अरे, एकदां चर्चगेट हून सुटलेली गाडी केव्हां ना केव्हां विरारला पोंचणार–कुणाची फास्ट, कुणाची स्लो–एवढाच प्रश्न–(हंसते)

श. : (चेहरा जोडे मारल्यागत)–मला वाटलं होतं तूं रोज माझी आठवण काढीत असशील. लॅला असतांना त्या 'वन्–ॲक्टर मध्यें' केवढा धुमाकूळ घातला होता, नाहीं आपण ?...

नि. : (हंसते) फारच मज्जा आली–अन बरं का शरद, मोठी गंमत आहे बघ ! तोच खेळ पहायला प्रभा आला होता–अन् तें काम पाहूनच त्यानं मला तिथल्या तिथं पसंत केलं– तुला आठवतं–इंटरव्हलला मी जरा बाजूला बोलत होतें– तें यांच्याशींच (समोरच्या रुबाबदार तरुणाच्या फोटोकडे कॅमेरा आपलें लक्ष वेधतो)–थॅंक्स हं—

श. : (कडवटपणें) कशाबद्दल ?...

नि. : तूं डायरेक्शन केलंस–म्हणून मी प्रभाला पसंत पडले–अन् इतकं सुखी जीवन माझ्या वांट्याला आलंय– अरे पण मी किती वेंधळी—

श : असूं दे असूं दे—

नि. : बरं, काय घेणार तूं ?–चहा कॉफी कीं, सरबत ?–अन् तुझ्याबरोबर मघाशीं एक-जण होता नाहीं का ?–बरं, काम काय काढलंस–तें नाहीं सांगितलंस–(हंसून) लग्न-बिग्न करतो आहेस कीं काय ?—

श. : (नाइलाजानं) आम्ही एक नाटक बसवतों आहोंत. तो लेखक आहे त्याचा–नवीन. आहे–

नि. : अरे वा––नांव काय नाटकाचं ?

श. : 'नकटीच्या लग्नाला !'

नि. : (खूप हंसते) छान चालेल या नांवाचं नाटक–

श. : आहेच तें छान ! मी दुरुस्त करून करून आतां छानच करून घेतलंय् त्याच्या-कडनं—तूं त्यांत काम करशील का, म्हणून विचारायला आलों होतों––

नि. : (खळखळून हंसते) मी ! अन् नाटकांत काम ! आतां ?

श. : कां ? त्यांत काय झालं ?

नि. : शक्य नाहीं.

श. : आग पण कां ?–कां शक्य नाहीं ?

नि. : माझं लग्न झालंय्––

श. : लग्न झालेल्या अनेक बायका हल्लीं नाटकांतनं काम करतात—

नि. : करीत असतील. पण––

श. : पण काय निरु ?–

नि. : एकतर मलाच इच्छा नाहीं–अन् प्रभालाहि आवडत नाहीं मी नाटकांत नाचलेलं––

श. : नाचतांनाच 'त्यांनी' तुला पसंत केली म्हणत होतीस ना ?

नि. : तेंच शेवटचं काम.

श. : त्यांच्या इच्छेसाठीं तुझ्या अंगांतली कला मारणं म्हणजे––

नि. : तें मला कांहीं ठाऊक नाहीं.

श. : मग खरं कारण कोणतं–तुला इच्छा नाहीं हें कां, त्यांना आवडत नाहीं—

नि. : एकच तें–

श. : एकच कसं ?–त्यांना आवडत नाहीं म्हणून तुला इच्छा होत नाहीं...होऊन चाल-णारच नाहीं...

नि. : (एकाएकीं तोंड झाकून रडूं लागते.)

श. : अग, अग––(तिच्या जवळ जाऊं पहातो.)

नि. : (रडत रडत आंत पळते.)

शऱ्याच्या भकास चेहऱ्याचा एक क्लोज-अप् घेऊन कॅमेरा व्हिजिटिंग रुममधल्या नाम्यावर स्थिरावतो–गेल्या वीस एक मिनि-टांत नाम्यानं अस्वस्थपणें घातलेल्या येर-झारांनीं चुरगळलेला गालिचा–दाखवून सूचकतेनं त्याच्या मनाची अवस्था व्यक्त करायची.

घड्याळ–आणखी दहावीस मिनिटें गेलेली दाखवायचीं–मग शऱ्या, निरु अन् तिचा–तो नवरा– नाम्याचा खलनायक– तिघेहि मनमोकळे हंसत बाहेरच्या व्हिजिटिंग रूम मध्यें येतात.

प्र. : (हंसून) बाकी कांहीं म्हण हं तूं निरू, या शरदरावांची स्टोरी एक्स्प्लेन करा-यची हातोटी कांहीं और आहे––

श. : अन् मुख्य म्हणजे– यांत निरूला जो 'रोळ' आहे ना–मोठ मोठ्या नटींना आयुष्य भर लोळून देखील मिळत नाहीं– म्हणून म्हणतों.

प्र. : माझी कांहींच हरकत नाहीं शी इज फ्री टु टेक हर डिसिजन—

इथं नाम्याच्या उजळलेल्या चेहऱ्याचा क्लोजअप्. ते तिघे खळखळून हंसल्यानें नाम्या भानावर येतो.

प्र. : माझं तें प्रिन्सिपलच आहे. हो, आपण कांहीं जुन्या जमान्यांतले नाहींत. बाय-कांच्या प्रगतीच्या आड येणारे नवरे– काय निरू ?

नि. : तूं कशाला रे आड येशील प्रभा-पण मलाच नाहीं वाटत काम करावसं—

(इथं नाम्याचा प्रश्नार्थी चेहरा टाकणें.)

श. : अग पण रोल ए वन आहे.

नि : कबूल आहे रे मला– जीव नुसता तुटतोय—

प्र. : मग सोडव ना त्याला– (एकटाच हंसतो)

नि : (निश्चयानं) नाहीं, जमणार नाहीं मला– बाबा अवघा आठ महिन्यांचा आहे. त्याला सोडून मला– कुठं जातां येत नाहीं– शिवाय, शिवाय–– मलाच नाहीं वाटत, माझ्या हातनं आतां कांहीं होईलसं––

[ नाम्या उभ्या उभ्याच बेशुद्ध. कॅरॅक्टर ॲक्टरच कौशल्य पणाला लागावं...

एकमेकाचा निरोप घेतला जातो. प्रभा अन् निरू बंगल्याकडे वळतात शऱ्या अन् नाम्या बस–स्टॅापकडे निघतात...

दोघेहि आपापल्या खिशांत हात घालतात. कॅमेरा दोघांचे चेहरे टिपतो. नाम्यानं बिडी काढली तर आपल्या खिशांत काडी नाहीं म्हणून शऱ्या शरमिंदा–अन् शऱ्यानं काडी काढली तर आपल्या खिशांत बिडी नाहीं म्हणूनच नाम्या शरमिंदा–कॅमेरा क्यू दाखवतो दोघांचेहि हात खिशांतून निघालेले नाहींत–सिम्बॉलिक––ॲक्शन !...नवा क्ल्यू– टाय-टल– 'झांकली मूठ !'––

बिगिनिंग तर झकासच आहे...मात्र साला हें नाटक बिगर––हिरॉईन केलं पाहिजे–हँ. !

❀

❀ या कथेंतील व्यक्तीचित्रांचें कुणा जिवंत, मृत, जिवंत असून मेलेल्या किंवा मरूनहि कीर्तिरूपें उरलेल्या व्यक्तिशीं सर्वां-शानें, अल्पांशानें, अगर बव्हंशानें साम्य आहे असें कुणाला वाटल्यास त्याला लेख-काचा इलाज नाहीं.





अनुक्रमणिका

# प्रवास माझ्या गोमंतकाचा



गोपाल कृष्ण भोबे

दुधसागर स्टेशनवरून गाडी हळू हळू पुढें सरकत होती. पूर्वी ही गाडी मध्येंच कुठेंतरी जंगलांत थांबत असे. अशी मध्येंच घनदाट जंगलांत कां थांबली हें कळत नसे. आणि मग दहा पंधरा मिनिटांनीं चौकशी केल्यानंतर असें आढळून येई, कीं कांहीं अदिवासी लोक जंगलांतली सुकीं लांकडे गोळा करून त्याचे भारे अतिस्वस्थ दरानें विकत असत. हे भारे रेल्वेचे नोकर विकत घेत असत. आणि केवळ त्याच्याकरितां मन मानेल तेवढा वेळ–जंगलांतल्या कुठल्याहि जागीं ही गाडी उभी राही. या मोंगलाई कारभाराला कोणीहि जाब विचारत नव्हता; पण आजची परिस्थिति वेगळी होती. नुकताच रेल्वे मार्ग सुरुंग वगैरे काढून दुरुस्त झाल्यानें गाडी धिम्या गतीनें पुढे सरकत होती एवढेंच.

सोनाळी स्टेशन सुटल्यानंतर रेल्वेलाईनच्या आजूबाजूला तांबड्या मातीचे ढिगाऱ्यांच्या ढिगारे दिसून आले. हें दृश्य मला नवीन होतें. पूर्वी आजूबाजूला कसें हिरवेंगार दिसत असे; पण आतां जिकडे तिकडे मातकट रंग दिसूं लागला. आजूबाजूला सारें करपून गेल्यासारखें वाटूं लागलें. जिकडे तिकडे मातीच माती; परंतु हीच माती कांहीं जणांच्या आयुष्याचें सायासाशिवाय सोनें करीत होती. या मातीच्या ढिगाऱ्यांवर फर्लांग फर्लांगाच्या अंतरावर एक एक पाटी लटकावली होती. डोंगरांतून खणून काढलेल्या त्या मातीची मालकी सांगणाऱ्यांच्या त्या पाट्या होत्या. गोमंतभूमीच्या रंध्रांत युगानुयुगें स्थिर राहिलेली ही शक्ति हजारों मैलांचा प्रवास करून आतां परदेशीं जाणार होती. जणूं त्या शक्तीला या गोमंतक भूमीचा कंटाळा आला होता. आणि म्हणूनच बऱ्या-वाईट, नालायक, लफंग्या माणसांना प्रेरणा देऊन ती स्वतःचा लिलांव करून घेत होती. कालच्या दरिद्री नारायणाला ती आज नवकोट नारायण करून सोडीत होती; परंतु 'आतां या भूमीचा संपर्क नको, एकदां मला जाऊं दे !' म्हणुन दूर दूर जात होती. इतकीं वर्षें वाऱ्या-वादळापासून त्या भूमीचें तिनें निष्ठेनें जतन केलें होतें.........

माझ्या मनांत या असल्या पोरकट विचारांनीं गर्दी केली, आणि गाडी कुळें स्टेशनांत केव्हां पोंचली मला कळलें देखील नाहीं.

कुळ्याच्या स्टेशनांत पूर्वी कोण धमाल असायची. गाडी स्टेशनांत आली रे आली, कीं सर्व डब्यांच्या दरवाज्यांना चाव्या फिरविल्या जात. मग बऱ्याच वेळानें तिघे चौघे कुणीतरी डब्यासमोर येऊन उभे राहात. मागाहून एक 'सॉल्दाद' येऊन डबा उघडी. आणि डब्यांत चोवीस तास उकडलेल्या माणसांना धमकीवजा शब्दांनी खालीं उतरायला सांगे. डब्यांतून एक एक माणूस सावकाशपणें बाहेर पडे. तीं चारहि माणसें डब्यांतून उतरणाऱ्या प्रवाशांकडे एक टक पहात असत. त्यांतला एक डॉक्टर, एक डॉक्टरांचा सुसज्ज सहाय्यक, आणि दोन गुप्त पोलीस असत हें मला मागाहून कळलें होतें. हा डॉक्टर देवी टोचल्या आहेत कीं नाहीं, कॉलऱ्याचें इंजेक्शन टोंचून घेतले आहे कीं नाहीं हें पाही–नसल्यास टोंचून घ्यावें लागे. प्रवासाच्या श्रमांनी एखाद्या नाजुक प्रकृतीच्या माणसाची प्रकृति किंचित नादुरुस्त असली, तर त्याला सरकारी झोंपडींत निवाऱ्याला जावें लागे. त्यानंतर पुर्तुगेज कस्टमचे सोपस्कार होत. नंतर पुर्तुगेज गुप्त पोलिसांच्या तपासणीला प्रारंभ होई. ही तपासणी तासभर चाले. संशय आलेल्या माणसाला पकडून ठेवित.

प्रवासाने वैतागलेले लोक या सर्व जाचांनी अधिकच वैतागून जात. बरें–हें सर्व आटोपलें आणि आतां गाडी सुटणार म्हणून सुस्कारा सोडावा तर तेंहि होत नसे. कारण कस्टम खात्यांत काम करणारीं माणसें दुपार असली कीं जेवायला, आणि संध्याकाळ असली कीं झोपायला–मडगांवी किंवा लगतच्या गांवीं जाणारीं असत–कुळ्याला याबाबतीत बऱ्याच अडचणी होत्या–त्यामुळें केवळ त्या नोकर वर्गाचें काम आटोपेपर्यंत गाडी खोळंबून राही. डब्यांत बसून आंबलेलीं माणसें मनातल्या मनांत पुर्तुगेज सायबाला आणि त्यांच्या नोकरांना लाखोली वाहात असत; परंतु आतां या घडीला कुळ्याच्या स्टेशनवर पूर्वीचें तें तसें काही एक नव्हतें. फक्त मूळची राजवट दाखविणारे पुर्तुगेज भाषेंत लिहिलेले रंग उडालेले फलक तेवढे होते. बाकी सर्व ठिकाणीं स्मशान शांतता होती.

स्टेशनवर जें दारू आणि अन्य वस्तू विकणारें खिस्त्याचें दुकान होतें त्या दुकानावर पिणाऱ्या ख्रिस्तावांची एकच गर्दी उसळली. मी सहज जाऊन त्याकडे एक 'कॅप्स्टन्' सिगरेटचें पाकीट मागितलें; पण 'कॅप्स्टन्' किंवा 'गोल्डफ्लॅक' यांपैकीं कोणतीहि सिगारेट तिथें मिळत नव्हती पूर्वी याच सिगरेटच्या पाकिटांना तिथें पांच आणे पडत असत, पण गोमंतक भारतात विलीन होऊन एक महिना देखील लोटला नव्हता





अनुक्रमणिका

सौंच या सर्व वस्तु--कापूर जितक्या लवकर जळून संपतो–तितक्या लवकर संपून गेल्या होत्या. बहुधा भारतीय सैनिकांच्या गोळ्या लागून त्या सर्व वस्तू मेल्या असाव्यात. न पेक्षां दुसरें काय म्हणणार !

*गोमंतकाला कुणी भारताचें काश्मीर म्हणतात तर कुणी महाराष्ट्राचें नंदनवन म्हणतात. गेल्या अंकापासून सुरू असलेलें हें प्रवास वर्णन वाचून त्याला काय म्हणावें हें तुम्हींच ठरवा.*

कुळ्याहून सर्व्हिसच्या गाडीने मीं माझ्या गांवीं जाऊं शकत होतों; पण मधले सर्व पूल उध्वस्त झाल्या कारणानें गाडी बराच मोठा वळसा घालून जात होती. शिवाय लोंढ्यापासूनचे माझे सहप्रवासी मित्र सरदेसाई व श्री. हेदे हे पणजीपर्यंत जाणार असल्याने त्यांची मला सोबत होती. म्हणून हा सर्विस मोटारनें जायचा बेत रद्द करून मीं त्यांच्याबरोबर जाण्याचें ठरविलें. पूर्वस्मृतींचें पटल डोळ्यांसमोरून सरकत असतांनाच गाडी कुळ्याहून पुढें सरकली. चांदर स्टेशन जवळ येत चालले होते. कुणीतरी म्हणालें –'काल इथल्या चावडीवर एक पुर्तुगेझ बावटा फडकूं लागला. चावडीवर एक भली मोठी नोटीस लाविली होती. "जो कोणी इथला हा बावटा काढायचा प्रयत्न करील, त्याचा जीव घेण्याकरितां आमची नऊ जणांचीं हत्यारें सज्ज आहेत. ताकद असेल त्यानीं पुढें यावें.' लोकांना हें सनसनाटी वृत्त कळल्यावर एकच हलकल्लोळ माजला, पण कुणीहि त्या बावट्या हात लावूं धजेना. अखेर गांवचा 'रेजिदोर' त्या जागीं आला आणि त्यानें तो बावटा खालीं उतरवून तो घेऊन गेला. त्या रेजिदोराच्या [गांवपाटलाच्या] घरांत, रात्रीं एका हातबॉंबचा स्फोट झाला. सुदैवानें कुणीहि जखमी झालें नाहीं. या गोष्टीची सरकारकडून अजूनहि चौकशी झाली नव्हती." त्याची ती रोमांचक गोष्ट संपतां संपतां सांवर्डें स्टेशन जवळ आलें. आतां गाडीनें जोरदार गति घेतली होती. सांवर्डेंचा पूल गाडीने धाड धाड ओलांडला आणि एक नागमोडी वळण घेऊन गाडी सांवर्डें स्टेशनांत शिरली.

मीं पाहिलेलें सांवर्डें हें पूर्वी कुळें किंवा चांदर एवढेंच एक लहानसें गांव होतें. फक्त तें मडगांव व कुळें यांच्या मध्यावर असल्यानें आणि व्यापारी दृष्टीनें तिथें जलमार्गाची सोय असल्यानें किंचित गजबजाटाचें होतें एवढेंच; परंतु आज तें एक आद्यावत–शहरवजा–गांव झालेलें आहे. तिथें आधुनिक तऱ्हेच्या सर्व सुखसोयी उपलब्ध झालेल्या आहेत. खनीज संपत्तीच्या ने आणीच्या उपयोगाचें तें एक मध्यवर्ती केंद्र असल्यानें बहुसंख्य खाण–मालकांनी त्याला शहराची शोभा आणलेली आहे. सांवर्ड्यांचें वर्णन पुढें ओघानें येईलच.

पूर्वी सांवर्ड्यांहून मोटारनें पणजीला जायचे म्हणजे एक फार मोठा द्राविडी प्राणायाम करावा लागे; पण आतां सांवर्डेंच्या नदीवर पूल बांधल्यामुळें सांवर्डेंहून पंचवाडी, शिरोडें, बोरी आणि बोरीहून डांबरी सडकेनें सरळ पणजी अशा जवळच्या रस्त्यानें मोटारने जातां येत होतें सुदैवानें सांवर्डें स्टेशनच्या बाहेर सरदेसायांच्या ओळखीची पणजीला जाणारी एक टॅक्सी मिळाली आणि सांवर्ड्यांहून आम्हीं पणजीला जायला निघालों. आमची टॅक्सी सांवर्डेंचा पूल ओलांडित असतांना सरदेसायांनी त्या पुलाबद्दल मला एक गंमतीची हकिगत सांगितली.

वास्तविक या बाजूचे सगळे पूल पुर्तुगेज सैनिकांनी उध्वस्त केले असतांना सांवर्डेंचा हा पूल तेवढा वांचला त्याला एक विलक्षण कारण होतें. ज्या सैनिक प्रमुखाकडे या परगण्याचीं सूत्रें होतीं त्याची एक प्रेयसी या पुला–पलिकडे जवळच राहात होती. आणि तिचें नुकसान होऊं नये म्हणून त्या सैनिक प्रमुखाने या सांवर्डेंच्या पुलाचें रक्षण केलें होतें. 'ऐसा महिमा प्रेमाचा...' आणिबाणीच्या प्रसंगीं देखील ख्रिस्ताची शिकवण तो पुर्तुगेज सैनिक विसरला नाहीं या बद्दल आणि त्याच्या ठिकाणीं वसत असलेल्या प्रेमाची निष्ठा पाहून त्याच्या विषयीं आदर वाटला. फक्त फूल हें प्रेमाचें प्रतिक आहे असें आजपर्यंत ऐकलें होतें, पण पुलाबद्दल नव्यानेंच ऐकत होतों.

सांवर्डें-ते बोरी हा रस्ता इतका खराब झाला होता कीं आपण सडकेवरून जात आहोंत कीं एखाद्या जंगलांतून हा प्रश्न पडत होता. त्यांतून खनीज संपत्तीची वाहतूक करणाऱ्या अजस्त्र मालमोटारी त्या अरुंद रस्त्यावरून बेपर्वाईनें धुळीचे लोट उडवीत जात असल्यानें आमची लहान गाडी जपून जात होती. आजूबाजूची झाडें झुडपें आणि कौलारू घरें धूळ खाऊन खाऊन लाले लाल झालीं होतीं. पानाचा रंग मद्रासी लुगड्यासारखा लाल हिरवा झाला होता. शिरोड्याला कामाक्षीच्या देवळाचें गोपूर दिसलें. कवि बोरकरांचें गांव लागलें. गाडी चढावावरून वर आली; आणि छिन्न विच्छीन्न झालेला बोरीचा पूल दिसला. गोमंतकांतला हा सर्वांत मोठा पूल. तो पुरा व्हायला किती तरी वर्षें लागलीं होतीं. नामांकित स्थापत्य विशारदांनी त्याची बांधणी आंखली होती. बांधणींत चूक होऊन कितीतरी वेळां तो मोडला होता. आणि कंत्राटदारांच्या पदरांत लाखों रुपयांचा नफा टाकून एकदांचा तो पुरा झाला होता. –एखादी संकल्पित गोष्ट कित्येक वर्षं रखडणें हें त्यावेळीं गोव्याचें वैशिष्टय होतें. एखाद्या ठिकाणीं डांबरी सडक बांधायची असें सरकार ठरवी. त्यानंतर त्याचें अंदाजपत्रक सादर होई. मग टेंडरें मागविण्यांत येत; पण हीं टेंडरें मागविण्याचें नुसतें नाटक असे. एका ठराविक कंत्राटदाराच्या हातांत हें काम दिलें जाई. आणि मग–एखाद्या जागीं शेण सारावें तसा–तो कंत्राटदार रस्ता नुसत्या डांबरानें सारवून काढी. त्यानंतर सरकारी परीक्षकांकडून रस्त्याची पाहाणी होई. त्यांचे खिसे आधींच गरम झालेले असल्यानें ते परीक्षक त्या पुन्हा झालेल्या सडकेवरून चक्कर मारून आल्यासारखें करून, वरिष्ठ अधिकाऱ्याकडे उद्‌गार काढीत 'वा! सुंदर!' कंत्राटदाचीं सर्व बिलें पास होत. फसाफस बाटल्या फुटत! आणि मग मृगाच्या पावसाचा पहिला शिडकाव तेवढा तो रस्ता सहन करी. आर्द्रांत त्याला शंभर ठिकाणीं खड्डे पडलेले असत. आणि पुनर्वसूंत त्या रस्त्याला डांबर नांवाची वस्तु लावलेली होती हें कुणाला सांगून देखील खरें वाटलें नव्हतें–इतका तो आपलें पूर्वीचें तांबडें रूप धारण करी. असें हें राहाटगाडगें अव्याहत चाललेलें असे! बोरीचा पूल शेवटीं असाच कित्येक वर्षांनीं एकदांचा पुरा झाला. लोकांनी सुटकेचे निःश्वास सोडले होते, पण पुर्तुगेजांनीं एका तासाच्या आंत तो खंड खंड करून

टाकला होता.

बोरीला डांबरी सडक लागली तशी गाडी भरधांव सुटली. वाटेंत सैनिकांच्या बराकी लागल्या; त्यांवर तिरंगा फडकत होता. बराकीच्या बाहेर भारतीय हत्यारी जवान गस्त घालीत होते. हां हां म्हणतां गाडी फोंड्याला आली.

कुणीतरी मोफतलालने, स्वतःकरितां बांधलेल्या एका टुमदार हवेलीशिवाय फोंड्यांत तसें म्हणण्यासारखें दुसरें कांहीं नव्हतें. मडगांव, म्हापसें, पणजी, या तीन शहरांतून आलेल्या बसगाड्यांचें तें विश्रांतिस्थान किंवा जंक्शन असल्यामुळें चहाची एकदोन हॉटेलें तिथें अधिक होती. शिवाय त्या परगण्याचे सरकारी अधिकारी आणि कचेऱ्या फोंड्याला असल्यानें आजूबाजूचे कारस्थानी 'भाटकार' लोक तिथें थोडीशी गर्दी करीत; पण मीं पाहिलेलें तें पूर्वीचें फोंडें आणि आतांचें फोंडें यांत बराच फरक होता. पुर्तुगेज सैनिकांचा फार मोठा तळ या फोंड्याला होता त्यामुळें सर्व तऱ्हेच्या सुखसोयी त्यांना उपलब्ध करण्यांत आल्या होत्या. नवीन इमारती, कचेऱ्यांना आधुनिक सुखसोयी, मजबूत बांधणीचे रस्ते इत्यादी. वाढत्या लोकसंख्येबरोबर बाजारपेठहि वाढली होती. आणखी एक दृश्य पाहून मीं थक्क झालों—

पणजी म्हापसें व मडगांवला जायचे तीन रस्ते फोंडें येथें जुळतात त्य सांध्यापासून एक दोन यार्डाच्या अंतरावर एक भव्य पुतळा उभा होता. मला वाटतें उभ्या गोमंतकांत भर चौकांत उभारलेला हिंदूचा असा हा एकमेव पुतळा. आणि त्याहून आश्चर्य असें कीं खुद्द पुर्तुगेज राजवटीकडून हें अनपेक्षित सत्कृत्य झालेलें होतें. हा पुतळा पुर्तुगेज शिल्पकाराकडून 'पुर्तुगाल' येथें बनवून गोव्यांत आणण्यांत आला होता. त्याचा अनावरण समारंभ गोव्याच्या पुर्तुगेज गव्हर्नरांनी स्वहस्तें केला असें त्यावर लिहिलेलें होतें. ज्या भाग्यवंताला हें असें भाग्य लाभलें होतें, त्यांचें नांव भिषग्वर्य रामचंद्र पांडुरंग ऊर्फ दादा वैद्य. त्रिविक्रम प्रभु लवंदे या प्रभुकृपा झालेल्या नाडी परीक्षक धन्वंतऱ्याचे हे शिष्य होते. दादा वैद्यांनीं अनेक गरिबांना जीवनदान दिलें होतें. अनेक काष्टौषधींचें संशोधन केलें होतें. कित्येक आधुनिक चळवळींचे आणि सुधारणांचे ते प्रवर्तक होते. अंत्रुज महालाचें भूषण होते; पण कांहींहि असले तरी त्यांचें असें स्मारक गोमंतकीयांनी करावयचें मनांत आणलें असतें तर तें होऊंच शकलें नसतें. कडव्या हिंदु द्वेष्ट्या पुर्तुगेज राजवटींत एका हिंदु माणसाला असें स्थान स्वप्नांत देखील मिळालें नसतें; परंतु मीं ही गोष्ट प्रत्यक्षांत पाहात होतों. या आश्चर्यामुळें त्या शिल्पांतले गुणदोष देखील मला दिसले नाहींत.

पुर्तुगालाहून हा पुतळा तयार होऊन आला आणि अधिकाऱ्यांनी तो ज्या वेळीं पाहिला, त्यावेळीं त्या पुतळ्यांत एक मोठी चूक राहिलेली त्यांच्या लक्षांत आली. पुतळ्याला नेसवलेलें धोतर उलटें नेसवलें गेलें होतें. म्हणजे पुढची निऱ्यांची बाजू मागें आणि कांसेची पुढें असा विलक्षण प्रकार झाला होता. पुढें हा पुतळा त्या शिल्पकाराला पुन्हां बनवावा लागला. आणि संकल्पित दिवशीं कांहीं पुतळ्याचें अनावरण होऊं शकलें नाहीं मागाहून दोन वर्षांनीं झालें. अशी एक गोष्ट मला तिथें कळली. विलंबानें कां असेना एक अशक्य गोष्ट शक्य झाली 'हें हि नसे थोडकें!'

आतां सूर्य हळू हळू माध्यान्हीं येऊं लागला तसा प्रवासाचा शीण अधिक जाणवूं लागला. घरची ओढ लागली. फोंड्याहून पावणेबाराला निघालों आणि वेलींग, म्हार्दोळ, मंगेशी, कुंडई भराभर मागें टाकून एकदम भाणस्तारीच्या पुलाकडे आलों. मूळ पुलाचे एखादी भाकरी सहज कुस्करावी तसे तुकडे तुकडे झाले होते म्हणून भारतीय सैनिकांनी दोन दिवसांत तयार केलेल्या 'बेली ब्रीज' वरून आमची गाडी पलीकडे गेली. ध्वस्त पुलाकडे मी मागें वळून पाहिलें आणि या पुलाबद्दल लहानपणीं ऐकलेली एक अख्यायिका आठवली.

पुलाचा एक मुख्य खांब कांहीं केल्या उभा राहिना. हरप्रयत्न करून पाहिले पण, छे! जाणती माणसें म्हणाली–'नदीवरच्या रक्षक पिशाच्याला आंगवण करा. कांहीं तरी बळी द्या–खांब उभा राहिल!' मग कोंबड्यांचे बळी गेले, बकऱ्यांचे बळी गेले तरी खांब उभा राहिना. त्या पंचक्रोशींत एक अनुभवी, हुशार, कित्येक पावसाळे पाहिलेलं माणूस होतें. त्यानें एक शक्कल काढली. अशा अनेक पिशाच्यांना त्यानें आपल्या हुषारीने शब्दांनीं बांधून ठेवलें होतें. नदीच्या किनाऱ्यावर उभे राहून त्यानें पिशाच्याला साद घातली 'हे देंवचारा एकदांचा हा खांब उभा राहूं दे, पूल पुरा होऊं दे, तुला दहा पायांचं जनावर आणि एक मण भात देईन.' देंवचार त्या अंगवणीला भुलला, दहा पायांचें जनावर मिळणार या स्वप्नांत गुंग झाला. शांत झाला. त्यानें खांब उभा राहूं दिला. पूल पुरा झाला. मग त्या हुशार माणसानें नदीच्या किनाऱ्यावर एका चटईवर एक मण भात आणि त्यावर एक मोठा खेंकडा ठेवून दिला आणि तो मुकाट घरीं येऊन बसला. आपला संकल्प त्यानें पुरा केला होता. दहा पायांचं जनावर म्हणजे खेंकडा हें देंवचाराला कळलें नाहीं. आपण शब्दाला बांधले गेलों आणि हिकमतीनें आपली फसवणूक झाली हें त्याला मागाहून कळलें. त्या रात्रीं तिथें फार मोठे आवाज आणि किंकाळ्यों ऐकूं येत होतें, असें लोक सांगत होते, पण शब्दांनी बांधलेल्या देंवचाराला कांहींहि करतां आलें नाहीं.

ही आख्यायिका स्मरणांत आली आणि माझें मलाच हंसू आलें. माणूस काय किंवा पिशाच्च काय दोघेहि लांचेला लालचावलेले असतात. एखाद्या वेळीं त्याची जन्माची फसवणूक होते आणि मग त्याला हात चोळीत बसावें लागतें. नाहींतरी लांच देणें, लांच घेणें, देतों म्हणून आश्वासन देणें या कारस्थानांवरच गोव्याचें राज्य चाललें होतें. कितीहि मोठा कडक शिस्तीचा अधिकारी गोव्यांत येऊं दे. गोव्यांतले कांहीं ठराविक व्यापारी अगदीं थोड्याच दिवसांत आपल्या रुमालाबरोबर त्याची घडी करून त्याला खिशांत ठेवतील. 'बॉल्सा आबॅर्ता, बोक फिशाद' (खिसा उघडा, तोंड बंद) अशी तिथें एक म्हणच आहे मुळीं. कोटि कोटि रुपयांचें सोनें, कोटि रुपयांच्या परदेशी चैनीच्या वस्तु गोव्याहून भारतांत आल्या त्या काय उगीच. मनांत आलें आतां भारत सरकारचे निस्पृह असे अधिकारी लोक तिकडे गेलेले आहेत ते या लांचखाऊ वृत्तीला सुतासारखे सरळ आणतील. मनांत असे विचार आले आणि ओठावाटे तसे उद्‌गारहि निघाले. मीं म्हटलें—'आतां भारतीय अधिकारी या लांच देऊन तुंबडी

[ पान ५२ वर ]









[पान १० वरून]

त्यामुळं मी शेरडीच्या नांवानं शिव्या मोजीत झाली गोष्ट आजीला बोललें न् आत्तांच्या आतां मला वाटली डाळ करून दे म्हटलं.

तेवढ्यांत वाडीवरच्या राही रुक्मिणी पुढं येत बोलल्या, ' आव्वानू ! ही कधा आली ? ' आणिक त्यांनीं माझा गालगुच्चा घेतला. मग आज्जी म्हटली, ' हिला वाटली डाळ पाइजें. कोथमीर उपटून बिंडा बांधून आली तर शेरडीनं केली पाक ! ' आणिक स्वतः आंत जाऊन तिनं हरबऱ्याची डाळ मापानं काढून भिजत घातली. तशी मग राही कशी म्हणाली, ' आपली बैठक नका मोडूं. ऐक ग तूं पण. '

' काय ग ? ' मला वाटलं राही माझ्यावर रागावलीच. म्हणून तिच्या मुगव्या लुगड्याच्या पदराचा चोळामोळा करीत मी तिच्यावर एवढाला एकेक डोळा केला.

त्या कारणानं रुक्मिणीनं मला " द्वाड !" म्हटलं न् पोटाशीं धरीत एक झक्कास गोष्ट केली —

" आला पाऊस झिरीमिरी. झाला चिखुल सरासरी. घरली मूठ चाड्यावरी. कोळपन केली कोळप्यावरी. भांगलन केली खुरप्यावरीं. काढणी केली ईळ्यावरी. पेंड्या बांधल्या भाऱ्यावरी. गोळा केलं दंडावरी. असं गुांव नगरी. भंवतनं हाईत डगरी. डगरीवर हाईत बुरुज. बुरुजावर हाई बळी. बळीच्या नाकांत सूर्व्याची नथ. नथीबाईला लावली आरली. आरल्याचं मोतीं मोजा किती. होत न्हाई त्येंची गनती. तर मग गनती करायची बंद करा न् ह्या हिराबाई पोरीनं दंगा केला तर तिच्यावर पदराची अब्दागिरी खुशाल धरा. "

मग बरीक मला हंसूं आलं. राहीच्या पदराखालीं मुडपून बसायचं म्हणजे भारी शिक्षा. म्हणून आवाज करणार नाहीं म्हणालें. तेवढ्यांत आज्जीनं चहा केला. तो आम्ही घेतला. आणि मग मला कळलं कीं, राही रुक्मिणीच्या घरीं लगीन निघालंय तर रुखवताच्या उखाण्यांची आज्जीजवळ तपासणी चाललीय ! एवढ्या ह्या दोघी सवतीसवती. पण बहिणींच्या पलीकडे प्रेमानं रहायच्या. म्हणून कोणाची लेक म्हणून मी मुद्दामच विचारलं नाहीं. कारण अमकीची अमूक असं त्यांच्यापुढं बोलायची सोय नव्हती. म्हणून मी आज्जीनं खायला म्हणून दिलेल्या भुईमुगाच्या शेंगा चेपून घेत त्यांची नाकांत नथ चढवली, कानांत झुबे घातले न् ओठांना पण कुलुप लावून बसले ऐकत. तर माझं हें ध्यान बघून रुक्मिणी बोलली, " हिचं पर करूं या लगीन मावशे ! " तशी मी माझा तो अवतार काढून टाकला न् जोंधळ्याच्या पोत्यावर जाऊन पालथी पडत कोण काय बोलतंय इकडे कान दिला.

तेवढ्यांत नाकांत तपकिरीची चिमट भरून आज्जी समोर येऊन बसली न् राहीनं उखाणा काढला—

' आमचं गांव लई मोठं शहर. भवतीनं डोंगर. शेजारी वहातूय वडा. पुढं हाई मारुतीचा वाडा. वराडाला आडवा गेला गाडा. नवरा आला शिवपाशी. उडाला थाट. म्होरं कळवातनीचा नाच. कोळ्याची आली तिथं कावड. येशीत जायाला म्हाप्रणीनं केली दवड. तिला दिली हरबऱ्याची वाटी. देवळांत झाली दाटी. लगीन लागलं. मामानं कन्यादान केलं. थाळा, तांब्या न् नूप लोटी दिली. जानवसघरांत माणूस बसलं दाटीवाटी. येऊंद्या म्हटले केरसुनी न् दिवटी. दिव्यांत करू नका खोटी. येऊंद्या खणानारळांची पाटी. पाटीत कुणी केली फजा. रुखवताला मग लई चढली मजा. कुणी आणे घालती. कुणी रंग खेळती. यिहीनी रुसल्यावानी दिसती. वसागळी घालायला झाली रात. पडलं तिढं. वराडांनीं जुंपलं गाडं. वाजंत्री निघालं त्याबीपुढं. घुंगरं वाजलं बैलगाडीची. गाडीबैल निघाली शिणगाराची. जावा नंदा निघाल्या शेल्याच्या. बुत्तीला दिल्या तेलच्या. गाड्या वाजल्या खुडुखुडा. आला याह्याचा वाडा. याही पडला हौसदार. हौस मनामधीं बोलणार वाडीकर. आणा घालायचा पडला फार धुंधकार. मागितले यिहिनीला काप दोनी. दोनी कापांचं सोनं पडलं फिक्कं. पाटल्यांचं पडलं फासं. मागितले मग बाजूबंद. त्याला बांदले रेशमी गोंडं. गोंडं रुतलं पोटीं. मागितली मग पिवळी घाटी. कखली म्हणती मारा बकरा. आपुन करती नखरा. रुखतात रुपय टाकी आकरा. आतां रुखवत मी उघडतीया तवा तुम्ही चोळीपातळाच्या घडीचा आपला बोल करा वधूं खरा. '

राहीचा उखाणा संपला तेव्हां आज्जीनं तो सगळा साईनसंगीत पुन्हां आठवून बरोबर असल्याचं सांगितलं. तेवढ्यांत मामीनं आंतून येत विचारलं, ' वाटल्या डाळीला चटणी लावू का हिरवी मिरची ! ' तशी मी चरकिनी उठून तिला हिरवी मिर्ची लाव म्हटलं न् आज्जीच्या जवळ येऊन तिच्या कुशींत शिरलें. मग ' अग लहान का काय आतां ? ' असं डोळे वटारून बोलत रुक्मिणीनं माझा कान पिरगळला

' एप्रिल फूल '

आणिक आपल्या डाव्या कानावरचा पदर मागं सारीत कांहीं आठवीत ती म्हणाली—

'काढणीत काढणी तुरीची, अवघड पायरी हिरीची. यिनीबाई भाकरी आणा न्हारीची तरच मग चोळी आणूं आमी जरीची असलं बोलावं का!'

म्हणून राही 'नको नको' म्हटली व आज्जीनं तिला सांगितलं, 'छे! लई बारीक बोलणं नग. मोठं करावं. सोब्बा येती. घराणं कळतं. वळणाची बाई म्हणत्यात. रुखवत कसा दणाणला पाइजे.'

त्यामुळं मग रुक्मिणीं मोठा आहाणा ध्यानांत धरत बसली राहीनंच पुन्हां एक चांगला उखाणा-बाहेर काढला—

'आल्या यिनी मांडवांत. यीन रुसली काय मागती? मागती वजरटिक्का आठ. पिकूं दे बालेकाट, मग देऊं वजरटिक्का आठच्या आठ.

यीन रुसली काय मागती? मागती पुतळ्यांची माळ. पिकूं द्यां आमची साळ. मग देऊं पुतळ्यांची माळ.

यीन रुसली काय मागती? पोरींच्या वेनीला सोन्याचं गोंड. येऊंद्यात घरांत पैशाचं हांडं. मग देऊं तुमाला सोन्याचं गोंड.

यीन रुसली काय मागती? यीन मागती हातचीं काकणं. येऊंद्यात घरी सराफाची दुकानं मग देऊन टाकूं तुमच्या हातची काकणं...'

पण ती बोलतां बोलतां थांबली. त्यामुळं मग आज्जीनं त्यापुढचं तिला आठवेना तर आपण केली उरल्याची भरती. म्हणाली— 'पुढचं मी सांगतें, ऐका—'

'यीन आली मांडवांत. बसली रुसून. पण मागती काय? मागती तांब्याची घागर. पण म्हणावं लेक दिलीया की चांगली नागर न आतां वो कुठली घागर?

आणि मग तो उखाणा तिथंच या परीनं थोडं बोलणं करीत मागं सरला न सगळं ध्यानांत आलं असं सांगीत राहीनं बोलणं केलं—

यीन आली पावणी, करीन म्हटलं म्हाट तर तिनं धरावी की मावारी जायला न विचारतांच पद्दाट. मजी करायचंच नव्हतं का मी करनारी पण नव्हतें?

यीन आली पावणी. करीन म्हटलं पोळ्या. पण भाकरी होत्या शिळ्या तर राहूनच गेलं. का मी करण्याजोगी नव्हतें का?

यीन आली पावणी. करीन म्हटलं रोटी तर गहू होते खपलींच्या पोटी राहून गेलं. म्हणून मी का करायजोगी नव्हतें का?

यीन आली पावणी. करीन म्हटलं आंबेमोहराचा भात. पण तांदूळ न् साळी पडल्या बळदाच्या आंत तर बाई राहूनच गेलं. म्हणून मी का करायजोगी नव्हतें का?

यीन आली पावणी. भरीन म्हटलं खणानारळानं तिची वटी. तर चाव्याच्या दुकानीं नव्हती खोबऱ्याची वाटी. मग राहूनच गेलं. पण आमी करणार नव्हतों का मी अशी करायजोगी नव्हते?

म्हणून म्हटलं आला आला रुखवत, त्याव टाकलं परद्दू, यीनीच्या लुगड्यांत शिरलं किरड्डूं तुमी काढताय का मी आपली वरद्दू?

राहीच्या या आहाण्यानं आम्ही सगळेच भारी हंसलों. आज्जीनं तिची तारीफ केली. म्हटली, 'लगीन चांगलं गाजेल आतां अशा तुमच्या उखाण्यांनीं. पण रुखवत चांगला करा बाई. पांच पंचवीस ताट कसं खुलून दिसावं.''

त्यामुळं रुक्मिणी म्हणाली, 'रंगीत कुरड्या, पापड्या, शेवाया, झालंच तर सांडग न् कायनून बायनून केलंया की मस्त! तुमीच बसा तळायला न् भरा दुरड्या कचकून.'

तेवढ्यांत मामीनं वाटली डाळ न् गरमागरम भाकरी लोणी लावून माझ्या हातांत दिली म्हणून मी पळत सैपाक घरांत गेलें. शिंक्यावरचं लोणी काढून आणली वेतलं आणि बसलें पुढ्यांत घंगाळ घेऊन जेवीत!

पण राही रुक्मिणीला तें खपलं नाहीं. त्या पण आल्या वाटल्या डाळीची चव घ्यायला. आज्जीनं कोरकोर भाकरी न् डाळीची डाव त्याच्या हातावर ठेवली. लहान पोरीगत त्यांनीं पण तें खाल्लं न् मग आज्जीला विचारलं, 'मावशे, शालू केवड्याचा घ्यावा? दुई अंग आमीच बगायचं हाय तवा म्हनतो'

'आणावा मनाजोगतां. किंमत आधींच कशी करावी? नऊवारी घ्यावा पण.'

'तर! नऊवारीच की! डागमातुर चांगलं करायचं बघा. ठसठसीत अगदीं!'

'पंचवीस तोळं कबूल केल्याती मालकांनीं.'

असूं दे. आपल्याच लेकीसाठीं.'

'न्हाई कोन म्हणतंया!'

'तर पैशाचा आकडा बोलूनी. हाय जवळ तर हावस करावी मनाजोगती. जीव थंड होतो. जाईजुईच्या मांडवापासून तें सगळं जिथल्या तिथं असावं.'

'पण मावशे, मालकास्नी एक सांग.'

[पान ५७ वर]

[पान ५० वरून]

भरणाऱ्या लोकांना वठणीवर आणतील; ' पण इतका वेळ गप्पगार बसून गाडी हांकणारा आमच्या टॅक्सीचा ड्रायव्हर म्हणाला— 'तुमचं म्हणणं राहूं द्या साहेब तसंच. अहो, ज्या व्यापाऱ्यानें इथल्या सर्वांचीं मनं दुखवून पुर्तुगेजांच्या युद्ध फंडाला पन्नास हजार रुपये रोख दिले त्याचीच मोटार घेऊन एक भारतीय अधिकारी फिरतोय आणि जेवतो खातो त्याच्याचकडे. अहो 'दाम करी काम' कशाला उगीच वठणीवर आणण्याच्या गोष्टी बोलतां?'

त्यानें सांगितलेली गोष्ट खरी होती की खोटी होती देव जाणे; पण साडेचारशें वर्षें पारतंत्र्याप्रमाणेंच रक्तांत भिनलेलं गोव्यांतलं लांचप्रकरण कधींहि संपणारें नव्हतं. देवचारांपासून पुर्तुगेज पिशाचांपर्यंत ज्यांनी आपल्या हिकमतीनें लांचलुचपतीनें बांधून ठेवलें ते भारतीय अधिकाऱ्यांना काय बधतील?

मला पणजीला सोडून माझे सहप्रवासी निघून गेले. आणि लांचलुचपतीच्या प्रकरणांचे विचार चक्र चालू असतांनाच-मला माझ्या गांवांत घेऊन जाणाऱ्या-लॉंच मध्यें मीं पाऊल ठेवलें......!

• • •

रु. ६०८,००,००,००० १९६१ सालीं लाइफ इन्शुअरन्स कार्पोरेशननें केलेला विमा व्यवसाय आजपर्यंत केलेल्या व्यवसायापेक्षां अधिक चांगला आहे. प्रतिकूल परिस्थितींतहि चांगला व्यवसाय आयुर्विमा कॉर्पोरेशननें मिळविला. किती तरी भागांत अतिवृष्टि आणि इतर संकटें यामुळें विमा व्यवसाय करणें अशक्य झालें होतें. परंतु आयुर्विमा कॉर्पोरेशनच्या निष्ठावंत स्त्री-पुरुष कार्यकर्त्यांना अशा परिस्थितींतहि व्यवसाय मिळविला, यामुळेंच ६०८ कोटी रुपयांचा नव्या व्यवसाय मिळूं शकला.

**१९६१ सालांतील कार्य थोडक्यांत असें :**

**नवा व्यवसाय :** ६०८ कोटी रुपये. १९६० पेक्षां हा व्यवसाय रु. १११ कोटींनीं अधिक आहे.

**नव्या पॉलिसी :** या वर्षीं एकंदर १८,६७,००० पॉलिसी देण्यांत आल्या. १९६० पेक्षां हा आंकडा २ लक्षांनीं अधिक आहे.

लाइफ इन्शुअरन्स कॉर्पोरेशन या यशस्वी कामगिरीचा फायदा तुम्हांलाच मिळणार आहे, कारण आयुर्विमा कॉर्पोरेशनच्या सर्व कार्याचा हेतु एकच आहे! आणि तो म्हणजे देशांतील पचवार्षिक योजनांना सहाय्य करणें व विमेदारांचें हित पाहणें.














- यशवंतराव चव्हाण
- आकाशवाणी काव्यगायन
- नानासाहेब चापेकर
- दारूबंदी-उत्कर्षाची वाटचाल.

## राजकारण

### श्री. यशवंतराव चव्हाण

गेल्या पांच वर्षांत चौथ्यांदा मुख्यमंत्री होण्याचे सौभाग्य ज्यांना लाभलें तें महाराष्ट्राचे लोकप्रिय तरुण नेते श्री. यशवंतराव चव्हाण ह्यांनीं नुकतीच अधिकारवस्त्रें धारण केलीं, ह्यांत कांहींच आश्चर्यकारक नव्हतें. संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेनंतर यशवंतरावांची मुख्यमंत्रीपदाची दोन वर्षांची कारकिर्द इतकी यशस्वी झाली होती कीं विरोधकांच्या शिडांतला वारा निवडणुकीपूर्वीच गेला होता. त्यामुळें प्रस्तुत निवडणूकींत त्यांचा व त्यांच्या पक्षाचा हमखास विजय अपेक्षित होता. आणि तो शंभर टक्के प्राप्त झाला. शिमगा होण्यापूर्वी झालेल्या ह्या निवडणूकींत कमकुवत विरोधी पक्षांनी शिमग्याची रंगीत तालीम केली; ह्या बेताल वातावरणांत यशवंतरावानी मात्र आपला तोल जाऊं दिला नाहीं. महाराष्ट्रांत कॉंग्रेसपक्षाच्या निवडणुकीच्या प्रचाराचें धुरीणत्व त्यांच्याकडे होते. आणि विरोधी पक्षांप्रमाणें व्यक्तिवाचक अवाच्य टीका करण्याचा मोह त्यांना झाला नाहीं एवढेंच नव्हे तर पक्षांच्या सभांतून तसें न करण्याचा आदेशहि त्यांनीं इतरांस दिला होता. कॉंग्रेसचा प्रचार ह्यामुळें उच्च पातळीवर झाला व त्यामुळेंच सामान्य शिष्ट मतदार कॉंग्रेसकडे आकर्षित झाले. स्वतंत्र पक्षाच्या मेनन विरोधी आघाडीच्या शेकोटींत आपलीं कणसें भाजून घेणाऱ्या इतर पक्षांच्या मतलबी वृत्तीमुळें यशवंतरावानीं जातीनें केलेल्या घडाडीच्या प्रचाराला अधिकच धार चढली होती. वृत्तपत्रांच्या स्वार्थी असहकारास तोंड देण्याचें ( निदान त्यांचे नाक दाबून तोंड उघडण्याचें ) सामर्थ्य त्यांच्यापाशीं होतें. पण खऱ्या मुत्सद्दीगिरीनें व गनिमी काव्यानें त्यांनीं शत्रूच्या आघाडींत खिंडारें पाडलीं व आत्मविश्वासानें मोर्चे बांधले, जागा लढवल्या आणि निश्चयाप्रमाणें संपूर्ण यशहि प्राप्त केले. पण हें सर्व यश मिळूनहि ते गर्वानें फुगून गेले नाहींत किंवा त्यांनीं इतरांना तुच्छहि लेखलें नाहीं. विधानसभेच्या नवीन अधिवेशनाच्या सुरवातीस सभागृह प्रवेश केल्यावर विरोधी बाजूस आघाडीवर स्थानापन्न झालेल्या आचार्य अत्र्यांना त्यांनीं जें अभिवादन केलें तें ‘ दुर्जनं प्रथमं वन्दे ’ ह्या न्यायाचें नसून खरें हार्दिक होतें असें मानण्याइतकें सौजन्य यशवंतरावांच्या अंगी आहे असे त्यांचे शत्रूहि मान्य करतील. त्यांची चाणाक्ष बुद्धि, अभ्यासपूर्ण व परिणामकारक वक्तृत्व, प्रसंगावधानी वृत्ति, समतोल आचारविचार, व निष्ठेनें परिश्रम करण्याची कुवत ह्यामुळेंच कठीण परिस्थितींत देखील त्यांनीं आपलें नेतृत्व अबाधित राखलें आहे. ‘ वज्रादपि कठोराणि मृदुनि कुसुमादपि ’ मनोवृत्ति त्यांची आहे. पण कर्तव्यनिष्ठुर असणें हे नेतेपदास आवश्यक आहे अशी राजनीति सांगते. व त्यामुळें क्वचित प्रसंगीं निष्ठुर वाटणारे यशवंतराव सूडबुध्दीनें सतत वागत नाहींत तर प्रसंगोत्तर झालें गेलें विसरून खेळीमेळीनें वावरूं लागतात हेहि त्यांच्या यशाचें गमक आहे.

‘ महाराष्ट्राचा उत्कर्ष साधण्यासाठीं शासनांतील व शासनाबाहेरील लोकांनीं एक दिलानें हातांत हात घालून उत्कर्षरुपी जगन्नाथाचा रथ पुढें नेला पाहिजे. ’ असें आकाशवाण[ी] वरून आवाहन करणारे यशवंतराव त्यांच्[या] ह्या चालू कारकिर्दींत विरोधकांना आण[...] निकट आणतील अशी अपेक्षा करणें चुकी[...] ठरणार नाहीं. प्रस्तुत निवडणूकींत यश मिळ[...]वूनहि कित्येक प्रांतांत पक्षांतर्गत बेबनावामु[ळें] कॉंग्रेसचे जे तीनतेरा झाले आहेत ते ध्यानां[त] ठेवून यशवंतरावांनीं योग्य दिशेनें पाऊ[ल] टाकण्यास सुरवात केली आहे. आपल्या मंत्रि[...] मंडळांत कार्यक्षम, उत्साही नवें रक्त ज[...] त्यांनीं आणलें तसेंच खातेबदल करून पा[...] व्यक्तींच्या हातीं कारभार देण्याचा सुयो[ग] पायंडा पाडला. मध्यवर्ती सरकारच्या कॉंग्रेस पक्षाच्या मनांत महाराष्ट्राविषयीं [...] अढी निर्माण झाली तिचें निरसन महाराष्ट्रां[त] कॉंग्रेसला मिळालेल्या नेत्रदीपक यशानें थो[...] फार झालें आहे. आणि ह्यामुळें मध्यव[र्ती] सरकारचें नैतिक व आर्थिक पाठबळ त्यांच्[या] योजनांना मिळून महाराष्ट्राची प्रगति अधि[क] जोमानें होईल अशी अपेक्षा करणें चुकी[चें] ठरणार नाहीं.

सुसंघटीत राज्यकारभार कार्यक्षम मुख्यमं[त्री] महाराष्ट्राला लाभलेले आहेत; त्यामुळें मह[ा]राष्ट्राची प्रगति झाली व होत राहील इत[...] आत्मविश्वास जनतेला होता. आणि म्हणून महाराष्ट्रांत कॉंग्रेसला हें भव्य यश प्राप्त झा[लें] ह्या यशाचे संपूर्ण मानकरी यशवंतराव आहे[त] व म्हणूनच त्यांच्या चालू कारकिर्दींत हे य[श] द्विगुणित करतील अशी आशा वाटते.

## सत्यं, शिवं, सुंदरम्

### आकाशवाणी काव्यगायन

गेल्या महिन्यांत आकाशवाणीनें आपला वार्षिक सप्ताह साजरा केला. त्यांत अंतर्भूत असलेला व आमंत्रित श्रोत्यांच्या उपस्थितींत जयहिंद कॉलेजच्या हॉलमध्यें झालेला मराठी काव्यगायनाचा कार्यक्रम प्रस्तुत सप्ताहाचें एक विशेष आकर्षण होतें. मराठींतील ख्यातनाम कवींची यादी वाचून आमंत्रण मिळालेले सज्जन कार्यक्रमास मोठ्या उत्साहानें उपस्थित झाले होते. कार्यक्रमाचें दिग्दर्शन राजकवि यशवंतांनीं केलें. यशवंतांनीं आपल्या प्राथमिक भाषणांत कवींची ओळख करून देण्याचा प्रयत्न केला; पण अगोदर माहिती करून घेण्यास अवसर न मिळाल्यामुळें त्यांनीं हे सर्व ख्यातनाम आहेत वगैरे वगैरे सांगून चार संदिग्ध वाक्यांत सर्वांची बोळवण करून इंदोरचे राजकवि काळेल्यांना पाचारण केलें. काळेल्यांच्या जुन्या आशयाच्या पण नव्या चालीच्या कवितांनीं उत्सुक प्रेक्षक जरा देह पसरून विश्रांति घेतात तोंच शांताबाई शेळक्यांचे काव्यगायन सुरूं झालें. कविता चांगल्या होत्या; पण अपुऱ्या आवाजामुळें प्रेक्षकांचे कान अतृप्त राहिले. आघाडीच्या ह्या दोन यष्ट्या चमक न दाखवतां पडल्यामुळें कार्यक्रमाची जी रंगत बिघडली ती विंदा करंदीकरांना सावरतां येईल अशा अपेक्षेनें श्रोत्यांनीं त्यांचें सूचक टाळ्यांत स्वागत केलें, पण जुन्या वासनांतले 'आततायी अभंग' देखील ते स्वरडोहांतून तारू शकले नाहींत. संजीवनीबाईंची काव्यापेक्षां गानमाधुर्याबद्दलच जास्त ख्याति; (तसा निर्वाळा संचालकांनीहि दिला होता) पण त्यांच्या पोरकट कवितांना श्रोते (कींव येऊन) हसले आणि म्हणून त्यांनीं आपल्या गोड गळ्यानें प्रौढप्रेमाचें गुणगान केलें. ह्या उलट बोरकरांच्या बसलेल्या घशांत 'सर्द' नाकाची भर पडल्यामुळें त्यांच्या (पूर्वी उठलेल्या) कविता पार बसल्या. प्रेक्षकांना खरें उत्सुक केलें तें इकडे अपरिचित असलेले मराठवाड्याचें कवि श्री. वा. रा. कान्त व नागपूरचे ना. घ. देशपांडे ह्यांनीं त्यांच्या कविता, कल्पना विलास, स्पष्ट वाणी व काव्य विषयामुळें परिणामकारक ठरल्या. पाडगांवकरांनी आपल्या पोतडींतल्या सुरवातीच्या कवितांनंतर म्हटलेल्या बालरटीकांनी वातावरण पुन्हां एकदां प्रफुल्लित केलें. त्यानंतरचीहि त्यांची कविता श्रोत्याना आवडली. वसंत बापटांची 'सकीना' रंगली पण 'पियु' लांबणीमुळें नाट्यपूर्ण म्हणून देखील कंटाळवाणी झाली. अनिलांच्या कविता चांगल्या असूनहि केवळ लांबलेल्या कंटाळवाण्या कार्यक्रमाच्या अखेरीस त्यांची पाळी आल्यामुळें त्या विशेष रंगल्या नाहींत. कंटाळलेले प्रेक्षक घड्याळाकडे दृष्टि ठेवून निघण्याच्या तयारींत असतांना संचालक महाराष्ट्र कवि यशवंतांनीं आपल्या अत्याधुनिक विश्वव्यापी आशयाच्या पहिल्या कवितेनें श्रोत्यांच्या सामान्यज्ञानाची उजळणी करून दिली तर दुसऱ्या 'महाराष्ट्र गीता' नें सरकारी ऋण फेडलें आणि श्रोत्यांना कार्यक्रमास उपस्थित राहिल्याबद्दल चांगलीच अद्दल घडविली. यशवंतांची अस्पष्ट वाणी, मागील कवींच्या काव्याचें मर्म सांगण्याचा व आगामी कवीचा परिचय करून देण्याचा होतकरू प्रयत्न आणि स्वतःची काव्यें हेल काढून गाण्याची संवय ह्या आयोजीत कार्यक्रमांत थोड्याफार मिळालेल्या यशाला गालबोट ठरलें. आकाशवाणीनें आपली कवींची यादी भविष्यांत नीट तपासून पेन्शनर कवींना गौरवपूर्ण रजा द्यावी, तसेंच तथाकथित पूर्व कीर्तीवर गुजराण करीत असलेल्या कवींनाहि पेन्शनींत काढून हमखास यशस्वी ठरणारे श्री. अनंत काणेकर, वि. द. घाटे इत्यादि हजरजबाबी प्रसंगावधानी व विनोद बुद्धीच्या कवींच्याकडे संचालन सुपूर्द करून मनमोहन, सोपानदेव चौधरी, आचार्य अत्रे, इंदिरा संत इत्यादि अजूनहि प्रतिभावंत असलेल्या व हमखास यशस्वी ठरणाऱ्या कवींना आमंत्रण देऊन आणखी कांहीं होतकरू पण उज्वल भविष्यांच्या कवींनाहि संधी दिल्यास असले आयोजित कार्यक्रम रंगून उपस्थित सज्जनांनाहि न्याय केल्यासारखें होईल.

### श्री. नानासाहेब चापेकर

चालू महिन्यांत नागपूर येथें भरणाऱ्या मराठी नाट्यसंमेलनाच्या चव्वेचाळिसाव्या अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून सुप्रसिद्ध सुविद्य नट श्री. शंकर नीळकंठ चापेकर ह्यांची नियुक्ति झाली आहे हें वर्तमान मराठी नाट्यरसिकाला आनंददायी ठरेल ह्यांत शंका नाहीं. आजमितीला श्री. नानासाहेब चापेकर हे जवळजवळ सत्तरीच्या वयांत आहेत व गेलीं कित्येक वर्षें नाट्यव्यवसायांतून निवृत्त होऊन पुणें आकाशवाणीवर काम करीत आहेत. एकेकाळीं नाट्यरसिकांना भारून टाकणारा नानांचा आवाज आकाशवाणीवरून अधुनमधून जेव्हां जेव्हां कानीं पडतो तेव्हां त्यांच्या जुन्या व यशस्वी नाटयकारकिर्दीच्या आठवणी जागृत होतात. केशवराव भोंसल्यासारख्या साक्षेपी नटवर्यानें चापेकरांची भूमिका पाहून त्यांचे उज्वल भवितव्य जाणून त्यांना आपल्या कंपनींत ओढून नेलें व शहाशिवाजी नाटकांत नायिकेच्या भूमिकेंत काम करण्याची संधी देऊन त्यांचा गौरव केला. केशवरावांच्या नंतर ललितकलादर्शचे भागीदार होण्याचे भाग्य नानासाहेबांना प्राप्त झालें ते केवळ वारसा हक्क म्हणून नसून त्यांची पात्रता व कंपनींतलें त्यांचे स्थान म्हणूनच. सत्तेचे गुलाम मधली नलिनीची भूमिका त्यांनींच अमर केली. पेंढारकरांनीं एक नवीन प्रयोग म्हणून नॉव्हेल्टी थिएटरांत भरजरी रंगवेषभूषेंत वरेरकरांचें 'तुरुंगाच्या दारांत' हें नाटुकलें जेव्हां सादर केलें तेव्हां चापेकरांच्या वांट्याला आलेली त्यांतली जोहराजान ही मुसलमानी गायिकेची भूमिका त्यांनीं गाजवली. त्याकाळीं मुंबईंत प्रयोग करीत असलेल्या एका पाश्चात्य नटसंचाला हें मराठी नाटक पाहण्यासाठीं खास आमंत्रण दिलें होतें. ह्या नाटकांतली नानांची स्त्रीभूमिका पाहून ही खरी स्त्री नाहीं ह्यावर त्यांचा विश्वास बसला नाहीं व त्यांनीं ग्रीनरूममध्यें जाऊन खातरजमा करून घेतली. पुढें अनंतराव गद्र्यांनीं स्थापन केलेल्या मुंबई नाटिका संगीत मंडळीचे ते आकर्षण ठरले. प्रेमदेवता ह्या नाटिकेंत आपल्याबरोबर संगीत कोहिनूर पंडितराव नगरकर ह्यांचीहि साथ घेऊन अनेककाळपर्यंत ह्या दोन सुस्वरूप स्त्रीपार्टी नटांनीं दीडतासी नाटिकांचा उपक्रम मराठी रंगभूमीवर यशस्वी करून दाखविला. कालांतरानें वयोमानामुळें स्त्रीभूमिका सोडण्याची तयारी आपणहूनच त्यांनीं दाखवली व इतर नटांना तालमी देणें वगैरे कामें पत्करली. रंगभूमीवरून निवृत्त होतांच त्यांनीं आकाशवाणीवर नोकरी पत्करली. वार्तानिवेदकाचें काम दिल्लीहून ते जेव्हां करीत असत तेव्हां सुरुष्







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



उच्चार व अनुकूल आवाज ह्यामुळें त्यांचे ध्वनिक्षेपण लोकप्रिय झालें. अलिकडे पुणें आकाशवाणीवर नाट्यदिग्दर्शनाचें कामहि ते करीत असतात व पुण्याच्या आकाशवाणी कार्यक्रमांतलें नाविन्य व विविधता यशस्वी करण्यांत चापेकरांचा हातभार बराच मोठा आहे. नानासाहेब फाटकांचे एकेकाळचे सहकारी असणारे नानासाहेब चापेकर त्यांच्यानंतर आज नाट्यपरिषदेचे अध्यक्ष होत आहेत हा योगायोगहि अपूर्व आहे, रंगभूमीच्या ह्या निस्सीम व सुविद्य उपासकांकडून प्रस्तुत अधिवेशनप्रसंगी अनुभवजन्य विचार ऐकावयास मिळून मराठी रंगभूमीला नवीन मार्गदर्शन होईल अशी खात्री वाटते. म्हणूनच अज्ञातवासांतून पुन्हां एकदां जनतेसमोर येणारें त्यांचे प्रसन्न व्यक्तिमत्व प्रस्तुत नाट्यसम्मेलनाचें आकर्षण ठरले तर त्यांत नवल नाहीं

## समाजकारण

### उत्कर्षाची वाटचाल :

दारुबंदी ही सरकारच्या पुष्कळशा चांगल्या योजनांपैकीं एक होय.

आपल्या कल्याणकारी राज्यानें तर दारुबंदीला राज्यघटनेमध्यें स्थान मिळण्यापूर्वीच आमच्या प्रांतांत दारुबंदीला सुरवात केली व आमचें राज्य हें भारतांत अग्रेसर सुधारणावादी राज्य आहे हें सिद्ध केलें.

दारुबंदी ही एका **मोठ्या कार्यक्रमाचा** एक छोटा पण महत्वाचा भाग आहे हें विसरतां कामां नये. आमच्या समाजाच्या राहणीचे मान, उंच करणें, गलिच्छ वस्त्यांचें उच्चाटन, राहण्यासाठी आरोग्यकारक घरांची तरतूद, शहर आणि ग्रामीण भागांत गरिबांतल्या गरीब इसमाला परवडेल अशीं चांगलीं करमणुकीचीं साधनें उपलब्ध करून देणें इत्यादि गोष्टी मोठ्या कार्यक्रमांत येतात.

राष्ट्रपिता महात्मा गांधी यांनीं दारूबंदीचें जें समर्थन केलें तें याच वैचारिक बैठकीवरून.

दारूबंदीच्या अंमलबजावणीत दोष आहेत व त्या दोषामुळें पुष्कळदां ही प्रभावी योजना फसल्यासारखी वाटते याची जनतेप्रमाणे सरकारलाहि जाणीव आहे. कायद्याला नेहमींच पळवाटा असतात तथापि त्यामुळें मूळ कायदा किंवा त्या मागील उद्देश चुकीचा आहे हें म्हणणें रास्त नव्हे. प्रत्येक नागरिकांने सरकारच्या या लोकोपयोगी योजनेला सक्रीय मदत केली पाहिजे व यश चिंतिलें पाहिजे.

### भारताचा मागोवा

कॅनडा देशहि आतां दारूबंदी करील असें वाटतें. त्या देशानें मुंबईसरकारकडे दारूबंदीचा तपशील मागीतला होता.

लंकेच्या बहुसंख्य बौद्ध प्रजेनें आपल्या सरकारकडे दारूबंदीची प्राथमिक अवस्था म्हणजे सरकारी पाहुणचारांत दारूबंदी व दारूचें एकंदरीत रेशनिंग मुद्दाम आग्रहानें मागितलें आहे.

अमेरिकेच्या चार प्रजासत्ताक राज्यांत संपूर्ण दारूबंदी आहे.

पाकिस्ताननेंहि दारूबंदीची तयारी चालविली आहे. त्याशिवाय कराची शहरांतून वेश्यांचीं हकालपट्टी करून भारतावर मात केली आहे.

महाराष्ट्रांत प्रॉटेस्टंट पंथाच्या ख्रिस्ती लोकांची संख्या सुमारें दहा लक्ष आहे. या लोकांचें एक युनाय टेड चर्च ऑफ नॉर्दन इंडिया व ऑफ सदर्न इंडिया असें धर्मपीठ आहे. पाद्र्यांची नेमणूक येथून होते. या पीठानें कायदाच केला आहे कीं जो माणूस कधींच दारू पीत नसेल त्यालाच पाद्र्याची दिक्षा द्यावी.

आज जगभर या गोष्टीचा उदोउदो होत आहे. सरकारच्या या सफल योजनेस आम्हीं आमचा मनःपूर्वक पाठिंबा व्यक्त करतो.

**—सारस्वत**

---

( पान ५२ वरून )

' काय ग ? ह्या म्हणतील तें ऐका म्हनावं '

' बाकीचं नग. एकमातुर पाइजे. '

' बोला की पन ! '

' आमास्नी टोपदरी नवी जरीची लुगडी घ्या म्हनावं

' घील की मग ! एवढा खरच करतूंया न् लुगडयांची काय अपूबाई ? '

' नग म्हणत्यात. पन आमी म्हनतो सोबा कशी त्याबिगर ? '

' नग का म्हनतूया ? '

' खरचात खरच नको असं त्येंचं बोलणं. '

' लइ शाना पडला. '

' तुम्हीच कुणी भीड घाटली तर ऐकत्याली. '

' जावा तुमी. बगीन मी ! '

आज्जीनं असा खुलासा केल्यावर त्या दोघी निघून गेल्या. पण मग राहीनं एकटीनंच मागं येऊन सांगितलं, ' माज्या म्हायारच्यांनीं मला घेतलंय. हिचं कोन हाय ? तर तवा हें लुगड्याचंच बोलाय आलों वतों. सांगूं नग कुनाला ? आण्यांचं निमित करून आलों. ' आणखी मग ती पण माघारी फिरली.

त्या कारणानं मी आज्जीला विचारलं, ' आतां तूं जाणार त्यांच्या नवऱ्याला सांगायला ? ' तशी आज्जी बोलायची ती मामीच म्हणाली, ' आपसूक देतील पाटील लुगडीं आणून. ह्या सुचून तरी देतील का मग ? ' आणि आज्जीनं पण मग तिच्या बोलण्याला दुजोरा दिला. म्हटली, ' गोष्ट खरी हाय. राही तिखट. रुक्मिन् गरीब. पण एका विचारानं असत्या त्या. रुक्मिन् लई बोलतच न्हाई. लगीन तिच्या लेकीचं. पण माल्कीन राहीचा. '

' जाऊं दे. आमच्या आईनं मला सकाळीं मारलं त्याचं काय ? ' आज्जी जवळ मी पुन्हां आईची कागाळी घातली. तर मला वाटलं आज्जी माझी कड घेईल. पण नाहीं. म्हणाली, ' असूं दे. उगच राग राग करती. काम पडतं म्हणून बोलती. तुला काय लागलं तर तूं आईला रमवीत जाऊं नगस. येत जा हिकडं निघून. '

त्यामुळं मी बकाबका वाटली डाळ दाबून पोट भरस्तोवर खाल्ली न् आज्जीवर रागावून आतां पुन्हां फुलाची कोथिंबीर तोडून घेत घरीं जाणार तर रुक्मिणी पुन्हां आपली दारांत हजर ! तशी आज्जी बोल्ली,

' का ग ? काय इसारलीस का काय ? '

आणखी रुक्मिणीनं तिला उत्तर दिलं, ' हं ! मावशे, मी तुला आंतल्या अंगानं पैका दीन. मला तूं एक लुगडं दे तुझं म्हणून आणून. राहीच्या आईनं दिलंय ! मला कोन हाय ? '

त्यावर आज्जीनं तिला पोटाशीं धरीत म्हटलं, ' दीन. तूं जा. पैका नको. ' तशी मग दोघांना पण असा हुंदका आला कीं, विचारूं नये. आज्जीनं ढीग तिची समजूत घातली न् मग अखेर शेवटीं तिला तसं करणं बरं दिसणार नाहीं. म्हणून ही गोष्ट आमची आई करील असा तिला निर्वाळा देऊन टाकला.

म्हणून मग फुलांची कोथिंबीर विसरून झाली गोष्ट आईला सांगावी म्हणून मी जी पळत सुटलें ती पार घरापर्यंत ! ' अग का ऽ ऽ अग ऽ ऽ का पळतीस ' असं ओरडत माझ्या मागून आज्जी येत होती तरीहि मी मागं वळून देखील पाहिलं नाहीं. कारण मला माझ्या आईला आज्जीचा बेत सांगायचा होता न् केळवणाची तयारी करतांना पुन्हां आईकडून लाडीगोडी करून घ्यायच्या होत्या !!

• • •




### या सम हा

स.न. वि. वि.

आपला मुक्त गोमंतक विशेषांक वाचतां गोमंतक मुक्तिसंग्रामाबद्दल जें वाचावेसें वाटत होतें तें वाचायला मिळालें. धन्यवाद.

मुक्तिसंग्रामाची गडबड अनुभवायला आपण गोव्यांत नाहींत असें वाटणाऱ्यापैकीं मी एक होतो. ती रुखरुख आपल्या ' निवडक पत्रांनी ' नाहींशी केली हें नमूद करणें, अगत्याचें. र. वि. पंडितांनी लिहिलेल्या लेखाकडेहि त्याचे बरेचसे श्रेय जातें.

पण खरें श्रेय विशेषांकाला ! गोमंतकाच्या मुक्तिसंग्रामाबद्दल बऱ्याच ठिकाणीं बरेंचसें वाचलें पण त्या सगळ्यांत आपला अंक ' यासम हा ' वाटला असें म्हटलें तर ती अतिशयोक्ति न ठरो.

उन्हाळ्यांत पाऊस आणि हिंवाळ्यांत ऊबदार ऊन्ह असावे तसा हा प्रसंगोचिततेचा प्रकार.

याच प्रत्राच्या निमित्तानें एका गोष्टीचा उल्लेख करावासा वाटतो. दीपावलींतल्या ' चौकटी ' असाव्यात तितक्या रंजक असत नाहींत. अर्थात् हें माझें मत. केवळ विनोदानें रंजकता येऊं शकते असें म्हणायचें नाहीं. पण कित्येक वेळीं ' या चौकटी टाकल्या नसत्या तर बरें झालें असतें ' असा विचार येतो, तो येऊं नये म्हणून मतप्रदर्शन.

—सुधारणा हवी !

आपला

**अनंत तळवलकर**, मुं. २८

### अभिनंदन

स. म. वि. वि.

अंक मिळाला. अभिनंदन. इतका चांगला व भरगच्च अंक काढल्याबद्दल ! गोव्यातील कांहीं रेखाटनें आपल्या हातची असती तर अंकाला वेगळींच झळाली आली असती.

कळावें.

आपला

**अरविंद गोखले**

५३७ सदाशिव

पुणें २

### योग्य जागरूकता

श्री. संपादक दीपावली यांस

' थोड्या वेळांत बराच चांगला मुक्त गोमंतक अंक जमवलात याबद्दल अभिनंदन. मला वाटते यांत प्रथम जागरूक (संपादक या नात्यानें ) आपणच असावेत. भोवे यांचा लेख फारच लवकर संपतो; त्याचा विस्तार आणखी हवासा वाटतो. श्री. साधल्यांना करामत साधली आहे. ' कळे बाय कळे ' बळेंच मनांत शिरतात. श्री. परांजप्यांच्या व्यासंगाची नोंद अभ्यासकांनीं करायलाच हवी. चौकटीतल्या मजकूरा बरोबरची व्यंग-चित्रें मसालेदार आहेत. मजकूरापेक्षां रेषांचे फटकारे अधिक बोलतात. गोमंतकाच्या स्वातंत्र्याशा ऊधेदी करणारी एखादी नकली कविता आपण टाळलीत हें फार चांगली झाली. ' चंदनाप्रमाणें सहाणहि झिजते परंतु कौतुक मात्र चंदनाचेच कां ?' हा प्रश्न मार्मिक वाटला. पण दिलेल्या उत्तराला मात्र विषयाची गांठ मारता आली नाहीं. ' ट्रू स्टोरी ' चें पत्र मनोरंजक आहे.

आपला

**दत्ता शिवराम कदम**

### कांहीं शंका

स. न. वि. वि.

आपल्या फेब्रुवारीच्या मुक्त गोमांतक विशेषांकांत श्री. र. वि. पंडित यांच्या ' ही लढाई !...छे ' रडाई ! या लेखांत सेंट फ्रांन्सिसचें पार्थिव शरीर फोंडें महालांत जतन करून ठेवलें आहे असा पहिल्याच परिच्छेदांत उल्लेख आहे तो चुकीचा वाटतो. सेंट फ्रान्सिसचा प्रार्थिव देह तीसवाडी महालांतल्या जुन्या गोव्याच्या चर्चमध्येंच होता.

तसेंच 'कलावंत गोमंतक' हा श्री गोपालकृष्ण भोबे यांचा लेखहि अस्पष्ट वाटला. गोमंतकीय हा कलासक्त एवंच विषयासक्त आणि म्हणून इतर भारतीयांहून वेगळा अशी जी एक भ्रामक समजूत गोमंतकाबाहेर आहे तिला या लेखांतल्या कांहीं कांहीं संदिग्ध विधानामुळें पुष्टीच मिळाल्यासारखा होईल. म्हणून हा लेख प्रत्येक मुद्याच्याबाबतींत अधिक वास्तवता दर्शक असावयास हवा होता.

सर्व अंकांत गोमंतकाविषयीं जे जे लेख आहेत त्या सर्वांत मला एकच उणीव भासली ती म्हणजे गोमंतकाची जी संस्कृति तिचें मुळीच दर्शन घडत नाहीं. वास्तविक गोमंतकाची अशी संस्कृति याच मध्यमवर्गानें घडविली आहे.

गोवेकरांच्या राजकीय, सामाजिक, शैक्षणिक, व्यवसायिक व सांस्कृतिक उन्नतीचा जो उल्लेख आहे तोहि योग्य वाटत नाहीं. कारण राजकारण सोडल्यास गोमंतकीय हा कोणत्याहि क्षेत्रांत मागासलेला असा नाहींच. राजकारणाचें त्याला शिक्षण मिळालें नाहीं. मी स्वतः एक गोमंतकीयच असल्यामुळें लिहिल्यावांचून राहवलें नाहीं. क्षमस्व.

आ. न.

**घनःशाम रांगणेकर**

चेंबूर, मुंबई–७

( गोमंतकाच्या एकंदर संस्कृति विषयीं आणि कलाबीजांविषयीं 'दीपावली मासिकाच्या' प्रथमांकापासून आजपावेतों बरेंचसें लिखाण श्री. भोबे यांनी केलेलें आहे. आपण जर तें नजरेखालीं घातलें तर ज्या गोष्टींची जाणीव आपल्याला हवी ती निश्चित होईल. मुक्त गोमंतक अंकांत त्याची पुनरुक्ति नको म्हणून एक सर्वसाधारण आढावा घेतला एवढेंच. आणि गोमंतकांतल्या नाट्य–संगीत–चित्र इत्यादि कलांविषयीं कांहीं सांगायचें झालें तर या प्रत्येक विषयाचा एक एक विशेषांक काढला तरी तो अपुराच पडेल. श्री. पंडितांच्या लेखांतला स्थलवाचक चुकीचा उल्लेख नजर चुकीनें राहिला. बाकीचीं मतें हीं आपली स्वतंत्र मतें आहेत. --**संपादक** )

हें मासिक, संपादक व मुद्रक श्री. दीनानाथ दलाल यांनीं आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रीज, मुंबई ४ येथें छापून / दलाल आर्ट स्टुडिओ, ४०।४२ कॅनेडी ब्रीज, मुंबई ४ येथे प्रकाशित केलें.






